






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.

ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.






अनुक्रमणिका

॥ श्री ॥




वर्ष ६८ वें ] नोव्हेंबर १९३७ [ अंक ११ वा

## अनुक्रमणिका



किरकोळ अंक किंमत ८ आणे. वार्षिक वर्गणी ( आगाऊ ) ट. हं. सह ३ रुपये.






अनुक्रमणिका

श्री

# विविधज्ञानविस्तार

वर्ष ६८, अंक ११, नोव्हेंबर १९३७.

# शिखांच्या आदिग्रंथांतील नामदेव

## थोडासा पूर्वेतिहास

शीख पंथाचा उगम पंजाबांत झाला व त्याचा विस्तारही प्रायः पंजाबापुरताच मर्यादित आहे. तरीपण या प्रांतापासून दूर असलेल्या महाराष्ट्रीयांना या पंथासंबंधीं जिज्ञासा व आदर वाटण्यास अनेक कारणें आहेत. यांपैकीं पहिलें कारण म्हणजे आपला सुप्रसिद्ध संत जो नामदेव त्यांच्या नांवावर असलेलीं कांहीं पद्यें या पंथाचा जो आदिग्रंथ त्याच्यामध्यें अंतर्भूत आहेत. दुसरें कारण म्हणजे या पंथाचा दहावा व शेवटचा गुरु जो गोविंद त्यांचा अंत महाराष्ट्रामध्यें नांदेड येथें झाला व शिखांच्या गुरुपरंपरेची येथें परिसमाप्ति झाली. तिसरें अगदीं अलीकडचें कारण म्हणजे आपल्या हरिजनबांधवांनीं या पंथामध्यें जाण्याची केलेली घोषणा होय. नुकतेंच मुंबईमध्यें शीखमिशनचें "खालसा" कॉलेज स्थापन झाल्यापासून शीख व महाराष्ट्र यांमधील संबंध जास्तच बळकट होतील, असें वाटूं लागलें आहे. अशा स्थितींत शिखांचे गुरु, त्यांचा आदिग्रंथ, त्यांचा 'खालसा' वगैरे संबंधीं आपणास फारशी माहिती नसावी, ही अत्यंत लांच्छनास्पद गोष्ट होय. हिंदुस्थानामध्यें अनेक धर्म व पंथ आले व त्यांच्या अनुयायांनीं हिंदुधर्माचा आस्थापूर्वक अभ्यास करून भल्याबुऱ्या बुद्धीनें ग्रंथ लिहिले; परंतु आपल्या लोकांपैकीं जे लोक त्या धर्मामध्यें गेले त्यांची गोष्ट सोडली, तर आपल्या हिंदु लोकांनीं त्यांच्या तत्त्वज्ञानाचा व इतिहासाचा काळजीपूर्वक अभ्यास केला असीं कांहीं उदाहरणें असतील तर तीं अपवादभूतच मानावीं लागतील.

शिखांसंबंधीं तपशीलवार माहिती देऊन त्यांचा इतिहास लिहिण्याचा प्रस्तुत प्रयत्न नाहीं. शिखांसंबंधीं महाराष्ट्रीयांना आपलेपणा वाटण्याचें जें पहिलें वर कारण सांगितलें, त्याचाच विचार करण्यापुरती आवश्यक जी माहिती तीच थोडक्यांत द्यावयाची आहे. कारण तिच्याशिवाय पुढील विवेचन नीट लक्षांत येणार नाहीं.

## शिखांचे दहा गुरु

### शांतिपंचक

शीख पंथाचा मूळ संस्थापक गुरु नानक यांचा जन्म लाहोरजवळ इ. स. १४६९ सालीं झाला. त्याच्या बापाचें नांव काळू असें होतें. तो क्षत्रिय जातीचा हिंदु दुकानदार होता. नानकाचा लहानपणापासून परमार्थाकडे ओढा असे. प्रत्येक गोष्टीच्या मुळाशीं जाऊन सत्य शोधण्याचा तो प्रयत्न करी. मुसलमानाचें कुराण व हिंदूचें पुराण त्यानें अभ्यासिलें होतें व हे दोनही धर्माचे लोक मूळ तत्त्वाला विसरून निष्कारण कलह व अनाचार माजवीत आहेत, याबद्दल त्याची खात्री झाली. ईश्वर एक असून त्याचें आराधन केवळ प्रतिमापूजनांत किंवा तीर्थयात्रा करण्यांत नसून मन पवित्र ठेवून शुद्धाचरणानें वागणें व ईश्वराचा नामजप व अखंड ध्यान करणें याच्यांत आहे, हें त्याच्या उपदेशाचें सार म्हणतां येईल. नानक १५३९ सालीं वारला व त्याच्या मागें त्याचा





अनुक्रमणिका

शिष्य अंगद याची त्यानें आपल्या जागीं योजना केली. नानकाला श्रीचांद नांवाचा एक मुलगा होता. परंतु त्याला त्यानें गुरुपदाकरितां निवडलें नाहीं. या मुलानें पुढें 'उदासी' नांवाचा पंथ स्थापन केला. अंगद हा नानकाचा एकनिष्ट भक्त होता. त्यानें आपल्या गुरूच्या वचनांचा संग्रह केला, ही त्याची महत्त्वाची कामगिरी होय. अंगद १५५२ सालीं निर्वतला व अमरदास हा क्षत्रिय जातीचा गुरु त्याच्या मागून आला. यानें आपली शिष्यशाखा बरीच वाढवली व १५७२ सालीं तो निधन पावल्या-वर त्याचा जांवई रामदास यानें त्याची जागा घेतली. अकबर बादशहा त्याचा फार चाहता होता व त्यानें दिलेल्या जमिनीवर जो तलाव बांधण्यांत आला तेंच सध्यांचें सुप्रसिद्ध अमृतसर होय. रामदासानंतर त्याचा मुलगा अर्जुन हा १५८१ सालीं गुरु झाला. हा पांचवा गुरु नानकाच्या गुरुपरंपरे-मध्यें अत्यंत महत्त्वाच्या आहे. कारण यानेंच शीख ज्याला आज गुरुस्थानीं मानतात त्या ग्रंथसाहेब किंवा आदिग्रंथ याची १६०४ च्या सुमारास रचना केली. इतकेंच नव्हे, तर शीख लोकांमध्यें शीस्त व संघटणा निर्माण करून या पंथाचें ऐश्वर्य व वजन वाढविलें.तें इतकें कीं, लाहोर प्रांताचा सुभेदार चंदुशाह यानें आपली मुलगी गुरु अर्जुनाच्या मुलाला देण्याची इच्छा दर्शविली असतां अर्जुनानें त्याच्या मागणीचा धिक्कार केला. पुढें जहांगीर बादशहाचा मुलगा खुश्रु यानें आपल्या बापाविरुद्ध बंड करून पंजाब प्रांताचा तात्पुरता ताबा घेतला असतां अर्जुनानें त्याची बाजू घेऊन त्याला यश येण्याबद्दल ईश्वराची प्रार्थना केली, अशा प्रकारचा आरोप ठेऊन त्याला बादशहापुढें बोलाविण्यांत आलें व दंड व कैद यांची शिक्षा देण्यांत आली. या साऱ्या प्रकाराच्या मुळाशीं उपरिनिर्दिष्ट चंदुशाहाचा हात होता, असें म्हणतात.या बंदिवासांत अर्जुनाचा अंत झाला. त्याचें कारण बंदिवासामध्यें त्याचे झालेले हाल होत. परंतु भाविक लोकांच्या मतें गुरु अर्जुन अधिकाऱ्यांच्या परवानगीनें रावी नदीमध्यें स्नानास गेला व तिच्या उथळ प्रवाहांत अदृश्य झाला! भाई गुरुदास नांवाच्या त्याच्या शिष्यानें आपल्या ज्ञानरत्नावलि नांवाच्या ग्रंथामध्यें गुरु अर्जुन हा व्यास व महंमद यांचे कार्य पुढें चालवून जगांतील वाढत्या दुष्टपणाला आळा घालून सत्य, शुद्धाचार व पावित्र्य यांची पुनः स्थापना करण्यास जन्मास आला असल्याचें लिहिलें आहे. मुसलमानांचें धर्मवेड व अत्याचार व हिंदु लोकांची कर्मठ व नेभळट वृत्ति यांना आळा घालून या दोनही धर्मांतील लोकांना एकत्र आणून त्यांच्यामध्यें सलोखा उत्पन्न करण्याचें एक नवें धर्मक्षेत्र शीख पंथामुळें खुले झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. गुरु अर्जुनाच्या देहावसानानंतर त्याचा बंधु पृथ्वीचंद यानें गुरुपद बळकाविण्याचा प्रयत्न केला. परंतु गुरु अर्जुनाचा अशाप्रकारें अंत घडवून आणण्यांत पृथ्वीचंदाचें अंग होतें अशा प्रकारचा वहीम आल्यामुळें त्याच्या शिष्यांनीं आपल्या दिवंगत गुरूच्या अकरा वर्षें वयाचा मुलगा हरगोविंद यास गुरु म्हणून जाहीर केला. याचा परिणाम असा

**क्रांतिपंचक**

झाला कीं, हरगोविंद याला अटक करून ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत कोंडून ठेवण्यांत आलें. पुढें कांहीं वर्षांनंतर जहांगिरनें त्याची सुटका करून आपला सरदार म्हणून त्यास आपल्या नोकरींत ठेवलें व १६२८ त जहांगिराच्या अंतापर्यंत तो तसा होता. लोकांच्या पारमार्थिक कल्याणाच्या नांवानें त्यांच्या ऐहिक कल्याणाकडे दुर्लक्ष करूं नये, अशी गुरु नानकाची शिकवण होती.तिला अनुसरून गुरु अर्जुनानें तुर्कस्थानाशीं संबंध ठेवून घोड्यांचा व्यापारही चालविला होता व अशा प्रकारें अर्थसंचय केला होता. परंतु हरगोविंदाला जे अनुभव आले, त्यामुळें शिखांनीं शस्त्राचा आश्रय केल्याशिवाय आपल्या पंथाचा तरणोपाय नाहीं, याबद्दल त्याची खात्री झाली. नानकापासून अर्जुनापर्यंत गुरूंचा आहारविहार सात्त्विक असून ते निवृत्तमांस होते. परंतु हरगोविंद




अनुक्रमणिका

शिकारी बनून अट्टल मांसभक्षक झाला. त्याच्या अनुयायांनींही त्याचा आदर्श पुढें ठेवून ते शरीर-संपत्ति वाढवूं लागले. अशा प्रकारें हरगोविंद हा शीख लोकांचा धार्मिक तसाच लष्करी पुढारी बनला. पुढें त्याच्या व पंजाबांतील बादशाही अमलदाराच्या झटपटी सुरू झाल्या. लाहोरच्या काजीचा एक घोडा त्यानें लांबवला व पुढें शिखांच्या म्हणण्याप्रमाणें त्याची मुलगी व मुसलमानांच्या म्हणण्याप्रमाणें त्याची रखेलीही उपटली! त्यामुळें कलहाग्नीनें पेट घेऊन अनेक रोमांचकारक युद्धप्रसंग उद्भवले. परंतु त्या सर्वांना धैर्यानें तोंड देऊन १६४५ सालीं हर-गोविंद यानें किरातपूर येथें देह ठेविला. त्याच्या एकंदर धाडसी व पराक्रमी वर्तनामुळें असंख्य तरुण त्याच्या निशाणाखालीं जमा झाले व मोगल साम्राज्याखालीं शीखांचें एक स्वतंत्र संस्थान बनलें. हरगोविंदाच्या मागून त्याचा दुसरा मुलगा हरराय गुरूपदावर आला. त्याच्या कारकीर्दींत विशेष कांहीं महत्त्वाच्या उल्लेखनीय गोष्टी दिसत नाहींत. हर-रायाला रामराय व हरकिसन या नांवाचे दोन मुलगे होते. परंतु वडील मुलगा दासीपुत्र असल्यामुळें धाकट्या मुलाला त्याच्या निधनानंतर १६६० सालीं गुरूपद मिळालें; परंतु दुर्दैवानें हा गुरु १६६४सालीं दिल्ली येथें देवीच्या आजारानें वारला.मरतांना त्यानें नवा गुरु बिआस नदीच्या काठीं बकला या गांवीं सांपडेल असें सांगून ठेवलें होतें. तेथें हरगोविंदचा धाकटा मुलगा तेघबहादूर आढळला. हररायाचा दासीपुत्र रामराय गुरुपद बळकाविण्यासाठीं धडपडत होता. परंतु शीख लोक तेघबहादुरालाच गुरुस्थानीं मानूं लागले. तेव्हां आपल्या मार्गांतील हा कांटा दूर करण्याकरितां रामरायानें अवरंगजेबाशीं संधान बांधलें. शिवाय तेघबहादूराची हालचालही आपल्या बापाप्रमाणेंच बादशहाच्या मनांत धाक निर्माण करण्यासारखी संशयास्पद होती. त्यामुळें १६७५ सालीं बंडखोर म्हणून त्याला अवरंगजेबानें निर्दयपणें ठार केला व त्याचे तुकडे चोहोंकडे फेकून दिले.

या वेळीं तेघबहादूरचा मुलगा गोविंद याचें वय अवघें पंधरा वर्षांचें होतें. हलालखोल जातींतून शीख धर्मांत गेलेल्या गुरूच्या शरीराचे हे तुकडे मोठ्या युक्तीनें व धैर्यानें गोळा करून त्याच्या मुलाकडून और्ध्वदेहिक क्रियाकर्म करविलें.* गोविं-दाच्या जीवालाही धोका होताच; तेव्हां त्याला यमुनेच्या कांठावरील डोंगरामध्यें नेऊन ठेवण्यांत आलें. सुमारें वीस वर्षें त्यानें या जंगलांत अज्ञात-वासामध्यें घालविलीं. या वेळीं त्यानें व्याघ्रादि हिंस्त्र पशूंची शिकार करावी. फारसी वगैरे भाषांचा

---

तेघबाहादूरच्या निधनासंबंधीं अनेक मतें आहेत. प्रो. ट्रंप यानें शीख ग्रंथांतील आख्यायिका दिली आहे ती अशी कीं, अवरंगजेबानें तेघबहादूरला मुसलमानी धर्म स्वीकारण्याबद्दल आग्रह चालविला व तो ऐकत नाहीं असें पाहून त्याचे हाल सुरू केले. जास्त हाल चुकवि-ण्याकरितां त्यानें आपल्या एका शिष्याला आपलें डोकें छाटण्याची आज्ञा करून आपला अंत करून घेतला. (The Adi Granth, Pg. LXXXVIII) मॅक्ग्रेगरनें निराळी हकीकत दिली आहे. तो अशीः राम-रायाच्या चिथावणीवरून तेजबाहादूरला अवरंगजेबाच्या दरबारांत आणल्यावर रामराय त्याला म्हणाला, "तूं गुरुपद स्वीकारून भयंकर अपराध केला आहेस; तरी असें कां केलें त्याचा खुलासा कर." तेव्हां तेघबाहादूर म्हणाला, "मी माझा खुलासा एका कागदावर लिहून तो माझ्या गळ्याभोंवतीं गुंडाळतों. तो तरवारीनें छाटतां येणार नाहीं." असें सांगून अवरंगजेबाला कोणालाही आपल्या मानेवर वार करण्याची आज्ञा करण्याबद्दल विनंति केली. त्याप्रमाणें वार केला गेला व डोकें धडापासून वेगळें झालें! त्या कागदावर खालील मजकूर होताः "शीर दिलें पण गौप्य दिलें नाहीं!" अवरंग-जेबाला हा प्रकार आवडला नाहीं. (The History of the Sikhs, 1846, Vol. I, Pg. 67-8) कनिंघमनें दिलेली वरील हकीकत मुसलमानी आधारा-वरून दिलेली असल्यामुळें त्यांत जास्त तथ्य दिसतें. आपलें मरण जवळ असल्याचें कळतांच याचा सूड उग-विण्याबद्दल त्यानें आपला मुलगा गुरु गोविंद यांस सांगितलें होतें. त्यामुळें शीख पंथाला पुढें निराळेंच वळण मिळालें,




अनुक्रमणिका

अभ्यास त्यानें इकडेच केला. आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाच्या कथा वाचून त्याच्या अंगांत स्वाभिमान संचरला होता. धर्मवेड्या अवरंगजेबानें आपल्या वडिलाचा क्रूरपणानें केलेला घात आठवून त्याचें रक्त सूडबुद्धीनें सळसळत होतें व आपल्या देशबांधवांची अगतिक स्थिति पाहून त्याच्या आंतड्यांना पीळ पडत होता. याच गोष्टीचा मनाला सारखा निदिध्यास लागून त्याचें अंतःकरण दीर्घचिंतनानें विकसित बनलें,व पराक्रमानें हृदयांत पेट घेतला. जातिभेदामुळें शतशः विदिर्ण झालेल्या व धार्मिक कर्मकांडाखालीं चिरडून शिळपट व निःसत्त्व बनलेल्या हिंदु समाजामध्यें नवचैतन्य उत्पन्न करण्यास गुरु नानक यानीं ज्या पंथाचा पाया घातला होता, त्या धर्ममंदिरावर कळस चढविण्याची जबाबदारी आपल्यावर आहे ह्या कर्तव्याची त्याच्या ठिकाणीं जाणीव उत्पन्न झाली. हिंदु समाजांतील दलित वर्गाचा उद्धार करून त्यांच्याकडून आपले कार्य साधण्याचा त्यानें संकल्प केला. "चिमणीच्या हातून गरुडाला जमिनदोस्त करीन," असें त्यानें अवरंगजेबाला कळविलें.

(You make Hindus Muhammedans, and are justified by your laws; now I on a principle of self preservation, which is superior to all laws, will make Muhammedans Hindus. You may rest in fancied security,but beware! for I will teach the sparrow to strike the eaglé to the ground.—Sketch of the Sikhs by Malcolm, 1812, Pg. 74.)

त्यानें 'नायना' पर्वतावर देवी मातेची आराधना चालविली. काशीहून एक अत्यंत विद्वान ब्राह्मण आणला. स्वतःही काळजीपूर्वक वेदपठण केलें व याच्या सहाय्यानें एक मोठा होम सुरु केला. त्यांतून देवी प्रकट झाली व तिनें त्यावर अनुग्रह केला, असें नमूद आहे. इतकें झाल्यावर त्यानें आपल्या

### खालसा

या नव्या धर्मपंथाची स्थापना व घोषणा केली. खालसा किंवा खालिसा या शब्दाचा उगम आरबी भाषेमध्यें असून त्याचा अर्थ पवित्र, मुक्त किंवा स्वतंत्र असा आहे. या पंथाप्रमाणें सत्य व सरलता हाच ईश्वरपूजेचा खरा मार्ग आहे. हा उच्च व तो नीच ही कल्पना खोटी आहे, म्हणून जाति विसरून जाव्या. असें करण्यांत त्याचा हेतु हिंदु लोकांची बौद्धिक दास्यांतून सुटका झाल्याशिवाय त्यांची राजकीय दास्यांतून मुक्तता होणार नाहीं, हाच दिसतो. यासंबंधीं ले. माल्कम म्हणतोः

"Though the code of the Hindus was calculated to preserve a vast community in tranquility. and obedience to its rulers, it had the natural effect of making the country in which it was established, an easy conquest to every powerful foreign invader; and it appears to have been the contemplation of this effect that made Guru Govind resolve on the abolition of caste and a necessary and indispensable prelude to any attempt to arm the original native population of India against the foreign tyrants. He called upon all Hindus to break those chains in which prejudice and bigotry had bound them and to devote themselves to arms, as the only means by which they could free themselves from the oppressive government of the Mohammedans, against whom a sense of his own





अनुक्रमणिका

wrongs and those of his tribe, led him to preach eternal warfare. His religious doctrine was meant to be popular and it promised equality. The invidious appelations of Brahmeen, Cchatriya, Vaisya, and Sudra were abolished. The pride of descent might remain and keep up some distinctions: but, in religious code of Govind every Khalsa Singh was equal and had a like title to the good things of this world and to the blessings of a future life."

—Malcolm's Sketch.

शीख पंथ हा हिंदु धर्माहून अगदीं निराळा धर्म आहे असें अट्टाहासपूर्वक कांहीं इंग्रजी ग्रंथकारांनीं प्रतिपादन केलेलें आहे. त्यामुळें यांत त्यांचा निराळा डाव तर नाहीं ना, अशी शंका घेण्यास त्यांनीं जागा करून दिलेली आहे. गुरु नानक किंवा शिखांचे इतर गुरु यांनीं हिंदूंच्या कांहीं धार्मिक समजुतींवर जसे कोरडे ओढले आहेत, तसे इतर भक्तिपंथी संतांनीही उद्गार काढले आहेत हें शीख गुरूंच्या व त्यांच्या वचनाचा तुलनात्मक अभ्यास केला असतां दिसून येतें. शीख पंथ हिंदु धर्माहून निराळा तर वारकरीपंथ, तसेंच ब्रह्मसमाज किंवा प्रार्थनासमाज, अगर आर्यसमाज वगैरे सुधारणावादी पंथही हिंदु समाजाहून निराळे असें म्हणावें लागेल. "The Sikh doctrine bore the same relation to the Hindu as the Prostestant does to the Romish," असा शिखांच्या इतिहासाचे संपादक मि. गॅरेट यानें जो निष्कर्ष काढला आहे, तो अगदीं बरोबर आहे. गुरु नानक हा राजा जनकाचा नवा अवतार होय. ही शिखांची भावना पाहिली (**The Dabistan** translated from the original Persian by Dr Shea & A. Trayer, Vol, II, 1843, Pg. 255 and 268.) म्हणजे हिंदु धर्म व शीख पंथ यांचा परस्पर संबंध कळून येईल. वास्तविक नानक पंथ हा भक्तिपंथांपैकींच एक आहे. इ. स. च्या अकराव्या शतकांत अवतीर्ण झालेल्या रामानुजाचार्यानें दक्षिणेकडे वैष्णव धर्माचा पुरस्कार केला. नाभाजीच्या म्हणण्याप्रमाणें रामानुजाच्या परंपरेंतीलच चौथा रामानंद आहे. त्यानें या पंथाला सर्वसंग्राहक रूप दिलें. कबीर, रविदास (रोहिदास), घना, पीपा, सेना हे रामानंदाचेच शिष्य होत. नानकाच्या शिकवणीवर आपणाला कबिराचा स्पष्ट परिणाम झालेला दिसतो. याविषयीं एच्. एच्. विल्सन यानें पुढील उद्गार काढलेले आहेत:—

"With an unprecedented boldness he (कबीर) assailed the whole system of idolatrous worship, and ridiculed the learning of the Pandits and doctrines of Sastras. He also directed his compositions to the Musalman, as well as to the Hindu faith and with equal severity attached the Mulla and Kuran... several of the popular sects being little more than ramifications from his stock, whilst Nanak Shah, the only Hindu reformer who has established a national faith, appears to have been chiefly indebted for his religions notions to his predicessor Kabir."

(H.H. Wilson's works, Vol. I.,P. 69)

नानकानें मूर्तिपूजेविरुद्ध उद्गार काढले म्हणून त हिंदु धर्माबाहेर गेला होता असें म्हणण्यांत अर्थ नाहीं. यासंबंधीं डॉ. ट्रंप यानें काढलेले उद्गार विशेष लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. तो म्हणतो,




अनुक्रमणिका

"We should he wrong in assuming that Nanak forbade the worship of other Gods on the grounds of the unity of the Supreme. Far from doing so, he took over the whole Hindu Pantheon, with all its mythological background with the only difference that the whole was subordinated to the supreme Brahm...Nanak remained a thorough Hindu, according to all his views and if he had communionship with Musalmans and many of these even became his disciples it was owing to the fact that Sufism, which all the Muhammadans were professing, was in reality nothing but a Pantheism, derived directly from Hindu sources, and only outwardly adapted to the forms of the Islam."

—Adi Granth Pg. c ii.

शीख धर्मामुळें हिंदुसमाजांतील खालच्या दलित वर्गांना स्वोद्धाराचा मार्ग मोकळा झाला व ते शीख गुरूंच्या भोंवतीं गोळा झाले. इतकेंच नव्हे, तर मुसलमान धर्मामध्यें गेलेल्या खालच्या जातीचे बहिष्कृत लोकही त्या धर्माचा त्याग करून शीख पंथांत शिरले. तेग्रबहादूर याच्या शरीराचे तुकडे याच लोकांनीं गोळा करून आणले होते. या लोकांस रंघऱ्हेटा (Ranghrheta) शीख म्हणतात. हें नांव 'रंग' या शब्दावरून आलें असावें असा समज आहे. परंतु, रंक रयत याचा तो अपभ्रंश असावा अशी मला शंका येते. मुसलमानी धर्मांतून शीख धर्मांत आलेल्या या लोकांना 'मझाबी' असेंही म्हणतात.

अशा प्रकारें समता, बंधुभाव व ऐक्य यांची ही घोषणा ऐकून कांहीं ब्राह्मण व क्षत्रिय या जातींतील शीख कुरकूर करूं लागले. परंतु खालच्या जातींतील लोकांना तितकाच आनंद होऊन ते खालसाकरितां आपलें शीर हातावर घेऊन तयार झाले. हरिजन लोकांना पवित्र तीर्थामध्यें स्नान करण्याची किंवा अमृतसरच्या शीख मंदिरामध्यें प्रार्थना करण्याची मोकळीक दिलेली पाहून वरिष्ट जातींपैकीं कांहीं लोक शीख पंथ सोडून गेले. परंतु गुरु गोविंदानें त्यांची पर्वा केली नाहीं. यज्ञकुंडांतून प्रगट झालेल्या देवी भवानीनें स्पर्श केलेलें शस्त्र पाण्यांत बुडवून तें शर्करा-मिश्रित तीर्थोदक त्यानें पांच शिष्यांवर सिंचन केलें व त्यांना सिंग ही पदवी दिली. हे खालसाचे आद्य प्रचारक होत. त्यांच्याकडून त्यानें स्वतः 'खालसा'ची 'पाहुल' नामक विधीनें दीक्षा घेतली व तो गोविंद-सिंग झाला. "जेथें जेथें पांच शीख जमतील,तेथें तेथें मी हजर होईन," असे त्यानें या वेळीं उद्गार काढले. या पहिल्या पांच शिष्यांमध्यें एक क्षत्रिय एक ब्राह्मण, व तीन शूद्र होते. या तीन शूद्रांपैकीं एक द्वारकेचा शिंपी ( a Chhimba or cloth-printer ) होता, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ( History of the Sikhs by T. D. Cunningham, 1918, Pg. 73 )

इतकें झाल्यावर त्यानें स्वतःच खरा पादशहा म्हणून घोषणा केली आणि त्याचा हा अचानक उदय पाहून भोंवतालच्या मोंगल साम्राज्याखालील मांडलिकांचें धाबें दणाणलें ! त्यांनीं अवरंगजेबाकडे गुरु गोविंदसिंगाची व्यवस्था लावण्याबद्दल धांव घेतली. अवरंगजेबानें लाहोर व सरहिंदच्या सुभेदारा-कडे ही कामगिरी सोंपविली. मोंगल फौजेनें गुरु गोविंदाला आनंदपूर येथें वेढा घातला. त्यानें आई बायका व मुलें यांची रवानगी सरहिंद येथें गुप्तपणें केली. परंतु विश्वासघातानें त्याच्या दोन मुलांना ठार करण्यांत आलें. या संकटाला धैर्यानें तोंड देण्याइतकी त्याची तयारी होती; परंतु कांहीं अवसानघातकी अनु-यायांनीं भायत्या वेळीं दगा दिल्यामुळें त्याचा नाइ-लाज झाला; तेव्हां तो चाळीस स्वामिनिष्ठ शिष्यांसह आपल्या मालकीच्या चामकोर नांवाच्या किल्ल्यामध्यें



पळाला. तेथेंही मोगलांची धाड आलीच व त्याचे राहिलेले दोन मुलगे या वेढयांत कामास आले. तिकडून रात्रीच्या वेळीं तो मोठ्या युक्तीनें निसटला व ठिकठिकाणीं हिंडत अखेर फेरोजपूरजवळ डामडामा (Dam Dama) येथें येऊन राहिला. हा प्रदेश अत्यंत उजाड व रखरखित असल्यामुळें त्याचा पाठलाग करण्याचें मोंगली फौजेनें सोडून दिलें. याच प्रदेशांत असतांना

**दशम पादशहाका ग्रंथ***

हा आदिग्रंथाचा पुरवणी वजा ग्रंथ त्यानें तयार केला. या दुसऱ्या ग्रंथामुळें गुरु अर्जुनानें तयार केलेल्या ग्रंथसाहेबाला आदिग्रंथ असें पुढें नांव मिळालें. दरम्यान १७०७ सालीं अवरंगजेब वारला. त्याचा थोरला मुलगा बाहादूरशहा यानें आपल्या दोघां बंधूना ठार करून आपलें सिंहासन निर्मक्षिक केलें. या वेळीं नव्या बादशहानें गुरु गोविंदसिंगाला बोलावून त्याचें सन्मानपूर्वक स्वागत केलें व दक्षिणेकडील सुभेदारी त्याला देऊं केली. आपल्या अनुयायांना गोळा करून आपलें आसन पुनः दृढ करण्याची ही संधि बरी आहे असा विचार करून गुरु गोविंदानें बादशहाचें म्हणणें मान्य केलें. त्यानें सटलज नदीच्या कांठीं प्रचंड फौज गोळा केली. परंतु मध्येंच एक संकट उपस्थित झालें. ज्या एका पठाण व्यापाऱ्याकडून गुरू गोविदानें कांहीं घोडे विकत घेतले होते, त्याच्याशीं पैशांवरून त्याची बाचाबाची झाली. या वेळीं त्या पठाणाचें बेमुर्वतखोर वर्तन असह्य होऊन गुरु गोविंदानें त्याला ठार केलें. या गोष्टीचा त्या पठाणाच्या मुलांनीं मनांत दंश धरला व दक्षिणेकडे गोदावरीच्या कांठीं नांदेड येथें गुरु गोविंद आपल्या शय्यागृहांत निजला असतां तेथें प्रवेश करून त्याच्या उरांत तरवार खुपसली. (The Siar ul MutaKharin ( i, 114 ) या ग्रंथांत तो मृत मुलांच्या दुःखानें मेला असें नमूद केलें आहे.) पठाणाला ताबडतोब पकडण्यांत आलें व त्याच्या मुद्रेवरील हास्य पाहून हें कर्म

---

* दशम किंवा दश्विन पातशहाका ग्रंथ हा पंजाबी बोलीपेक्षां गंगेच्या आसपासच्या भागांतील हिंदी भाषेमध्यें आहे. लिपी मात्र गुरुमुखी. सुमारें ४० अक्षरांची ओळ अशा २३ ओळी असलेलीं १०६६ पृष्ठें आहेत. त्यावरून या ग्रंथाचा विस्तार कळून येईल. याचीं एकंदर सोळा प्रकरणें आहेत. १ **जापि** (प्रातःस्तोत्र), २ **अकाल स्तुत** (ईशस्तुति), ३ **विचित्र नाटक** (यांत आपल्या वंशाचा इतिहास, अवतारकार्य आणि हिमालयांतील राजे मोंगल यांच्याशीं झालेल्या युद्धांची माहिती गुरुगोविंदानें दिलेली आहे.) ४, ५, ६, **चंडिचरित्र** (त्यांत चंडीभवानीने मधुकैटभ, महिषासूर, धुमारलोचन, चंड व मुंड, रक्तबीज, व शुंभनिशुंभ या राक्षसांचा कसा संहार केला याची माहिती आहे.)

वरील पांच प्रकरणें व सहाव्या आरंभींचा भाग स्वतः गुरु गोविंद यानें लिहिला असें म्हणतात. पुढील भाग शाम व राम या दोघां लेखकानें लिहिला तो हाः ७ **ज्ञानप्रबोध** (महाभारतांतील राजांच्या उल्लेखांतील ज्ञान व ईश्वर यांची गायिलेली महती). ८, ९ **चौवीस अवतारांसंबंधीं चौपाया** (मच्छ, कूर्म, वराह वगैरे), १० **ब्रह्म्याचे अवतार** (वाल्मीक, कश्यप, शुक्र वगैरे) व प्राचीन राजे (मनु, पृथु, सागर, बेन, मांधात, दिलीप, रघु, अज.) ११ **रुद्राचे अवतार** (दत्त व पारसनाथ) १२ **श्रीमुखबाक्** (वेदपुराणे व कुराणयांच्या विरुद्ध ३२ पद्यें. हीं गोविंदाच्या नांवांवर घालतात.) १४ **हजार शब्द** (ईश्वरस्तुति व लहानसान देवदेवता व संत यांच्या भक्तीची विफलता) १५ **स्त्रीचरित्र** (४०४ कथा. एका राणीचें आपल्या सावत्र मुलावर प्रेम बसलें पण तो तिला वश होईना म्हणून तिनें त्याच्यावर बलात्काराचा आळ घातला. तें ऐकून राजानें पुत्राला देहान्त शिक्षा ठोकली. त्या वेळीं राजाला त्या कर्मापासून परावृत्त करण्याकरितां प्रधानानें सांगितलेल्या गोष्टी. अर्धा ग्रंथ यांनीं व्यापला आहे.) १६ **हिकायत** (म्हणजे कथा. या फारशी भाषेमध्यें पण गुरुमुखी लिपींत आहेत. अवरंगजेबाला शुद्धीवर आणण्याकरितां दयासिंग व इतर पांच शिखांच्या हस्तें त्या गुरुगोविंदानें त्याच्याकडे पाठविल्या होत्या असें म्हणतात.)




अनुक्रमणिका

पितृघाताचा सूड उगविण्याकरितां त्यांनीं केलें हें गुरु गोविंदाला कळून चुकलें. स्वतःला आपल्या पित्याच्या मृत्यूबद्दल अवरंगजेबाचा सूड उगवितां आला नाहीं तें काम ह्या पठाण पुत्रांनीं केलें, याबद्दल त्याला त्यांच्या पितृभक्तीचें फार कौतुक वाटलें. "तुम्हीं केलें तें ठीकच केलें, असे तो त्यांना उद्देशून बोलला व त्यांना कोणताही त्रास न देतां त्यांची मुक्तता करावी, अशी त्यानें आपल्या अनुयायांना आज्ञा केली.* गुरु गोविंदाचे चारही पुत्र मारले गेले होते हें वर सांगितलेंच आहे. यापुढें आपल्यानंतर आम्हाला मार्गदर्शक गुरु कोण, अशा आशयाचा प्रश्न तेथें जमलेल्या शिष्यांनीं विचारला असतां तो म्हणाला, " धीर सोडूं नका. दहा गुरूंनीं आपलें अवतारकार्य पार पाडलेलें आहे. यापुढें खालसा मी अमर अशा ईश्वराच्या स्वाधीन करतों. ज्यांना गुरूचें दर्शन हवें असेल, त्यांनीं आदिग्रंथ पाहावा. गुरु खालसाबरोबर आहे. दृढ निश्चय व विश्वास यांची कास सोडूं नका, जेथें जेथें पांच शीख जमतील तेथें तेथें मी हजर आहें, असें समजा. " या वेळीं त्याचें वय सुमारें अठ्ठेचाळीस वर्षांचें होतें. नांदेडमध्यें त्यानें संवत १७६५ कार्तिकांत म्हणजे इ. सन १७०३ अखेरीस पाय ठेवला अशी तेथें दंतकथा प्रचलित आहे. म्हणजे साधारणपणें पांच वर्षें त्याचें महाराष्ट्रांत वास्तव्य झालेलें दिसतें.

*डॉ. ट्रूंप (the Adi Granth Pg.xciv) व मॅक्ग्रेगार (*Hist. of the Sikhs vol. I, Pg.* 100) यासंबंधीं कांहींशी निराळी हकीकत दिली आहे. ती अशी: ज्याच्या आज्याला हरगोविंदानें व ज्याच्या पित्याला स्वतः गुरु गोविंदानें ठार केला होता, अशा एका पठाणाला त्यानें स्वतःच्या नोकरीमध्यें ठेवला व त्याच्याबरोबर तो बुद्धिबळ खेळत असे. गुरु गोविंद आपल्या जीविताला अगदीं कंटाळून गेला होता, व आपला अंत त्याला घडवून आणावयाचा होता असें दिसतें. तेव्हां "ज्याच्या आज्यानें तुझ्या आज्याला व ज्यानें तुझ्या पित्याला ठार केलें त्याचा सूड न घेणारा तूं कुलकलंक आहेस, अशा प्रकारें निर्भर्त्सनापूर्वक त्याला चिडवून त्याच्या हस्तें स्वतःच्या उरांत कट्यार खुपसून घेतली. पुढें ही जखम शिवून भरतही आली होती. परंतु तो मरण्यास उत्सुक झाला होता. त्याकरितां एक बळकट धनुष्य त्यानें आणविलें व तें इतक्या जोरानें ओढलें कीं त्यामुळें त्याच्या जखमेचे टांके तटातट तुटून आंतडीं बाहेर आलीं !

## आदिग्रंथ

सध्यां ज्या ग्रंथाला शीख लोक आपल्या गुरुस्थानीं मानतात, त्या आदिग्रंथासंबंधीं चार शब्द सांगतों. हा ग्रंथ १६०४ च्या सुमारास गुरु अर्जुन यानें रचिला हें वर सांगितलेंच आहे. या ग्रंथामध्यें निरनिराळ्या एकतीस रागांमध्यें, १ नानक, २ अंगद, ३ अमरदास, ४ रामदास व ५ अर्जुन या प्रथम गुरुपंचकाची वाणी असून पुढें उत्तर क्रांतिपंचकांतील चौथा गुरु तेजबहादुर याच्याही लिखाणामध्यें गुरु गोविंदानें थोडी दुरुस्ती करून त्याची जोड दिलेली आहे. स्वतःच्या लिखाणाचा स्वतंत्र ग्रंथ तयार करावयाचा असल्यामुळें आपली वाणी एक श्लोक वगळला तर त्यानें या ग्रंथांत अंतर्भूत केली नाहीं. शिखांच्या समजाप्रमाणें नानक हा एकच असून निरनिराळे गुरु हे केवळ त्या एकाच अमरज्योतीचे केवळ आश्रय आहेत. त्यामुळें पहिल्या नऊ गुरूंनीं नानक हेंच नांव धारण केलेलें आहे, ही गोष्ट मुद्दाम लक्षांत ठेवण्यासारखी आहे. पाहाः—

"The Sikhs say that Nanac had been without a real body, but visible by the power of his individuality, and they believe that when Nanac expired, his spirit became incarnate in the person of Angad, who attended him as his confidential servant. Angad at his death, transmitted his soul into the body of Amardas: and this Guru, in the same manner, conveyed his spirit into




अनुक्रमणिका

the body of Ramdas; whose soul transmigrated into the person of Arjunmal. In short, they believe that with a mere change of name, Nanac the First became Nanac the second, and so on, to the Fifth in the person of Arjunmal. They say, that whatever does not recognise in Arjunmal the true Baba Nanac is an unbeliever."

—The Dabistan. Vol. II, Pg. 254.

ज्या दबिस्तान नांवाच्या ग्रंथांतून वरील उतारा घेतलेला आहे, त्या फारसी ग्रंथाचा लेखक Muhsin Fani हा हरगोविंद यांच्या समकालीन असून त्याला आलेल्या हर गोविंदाच्या पत्रावर नानक अशीच सही होती. (The Guru Govind, in a letter to the author of this work, gave himself the title of Nanac which was his right distinction–Pg. 211)

ग्रंथसाहेब हें एक नगर मानून प्रत्येक गुरूची वाणी हा स्वतंत्र महला कल्पिला आहे, म्हणजे नानकाची कविता महला १, अंगदाची महला २, अशा प्रकारें निरनिराळ्या रागांमध्यें ही मांडणी आहे. गुरूची वाणी झाल्यावर प्रत्येक रागाच्या शेवटीं निरनिराळ्या भगतांची वाणी दिलेली आहे. ते भक्त पुढील प्रमाणें आहेतः

१ जयदेव ( भक्तविजय अ. २ पहा )
२ नामदेव ( भ. वि. अ. ४, १०–१५, १८, २०, २१. )
३ त्रिलोचन ( संतलीलामृत अ. २७ )
४ परमानंद ( जोगा परमानंद. ? भ. वि. अ. २० )
५ सदन ( सजण कसाई. )
६ बेणी (?)
७ रामानंद ( भ. वि. अ. ७. )
८ धना ( जाट. भ. वि. अ. ५७ )
९ पिपा ( भ. वि. अ. २६ )
१० सेना ( भ. वि. अ. ३४ )
११ कबीर ( भ. वि. अ. ५, २४ )
१२ रविदास ( रोहिदास. भ. वि. अ. २५ )
१३ मिराबाई ( भ. वि. अ. ३८ )
१४ शेख फरीद ( भ. वि. अ. ५७ )
१५ भिकण (?)
१६ सूरदास ( भ. वि. अ. ३३ )

यांशिवाय अमरदास, रामदास आणि अर्जुन यांच्या नऊ भाटांचीही थोडी वाणी शेवटीं आहे.

### अभ्यासकांच्या अडचणी

प्रत्येक ओळ सुमारें ४५ अक्षरांची व अशा दर पृष्ठाला सुमारें ४० ओळी असलेलीं ७६८ पृष्ठें असा या ग्रंथसाहेबाचा विस्तार आहे. परंतु ही पृष्ठसंख्या अभ्यासकांना तितकीशी भिवविणारी नसली, तरी त्यांतील भाषेची विविधता व दुर्बोधता अभ्यासकांना गोंधळांत पाडते. हिंदूंचे वेद, बौद्धांचे त्रिपिटिक, मुसलमानाचें कुराण पारशांचा झेंडा आवेस्ता वगैरे धर्मग्रंथांची भाषा जरी जुनी व कठीण असली, तरी तिचें स्वरूप एकच असल्यामुळें कोश व व्याकरण यांच्या सहाय्यानें त्यांचा अभ्यास करतां येतो. परंतु मॅकॉलिफ याच्या म्हणण्याप्रमाणें ग्रंथसाहेबांत असंख्य वाक्प्रकार आहेत. ( Hymns are found in Persian, mediaeval Prakrit, Hindi, Marathi, old Panjabi, Multani, and several local dialects. In several hymns the Sanskrit and Arabic vocabularies are freely drawn upon. Preface Vol. I ). प्रो. मॅक्समुलर Auld Lane Syne मध्यें म्हणतो, "The language of the Granth is generally called Panjabi and it was supposed that a scholar who knew modern Punjabi






अनुक्रमणिका

might candly learn to understand the language as it was found hundred years ago. But this is not the case. The language of the Granth Sahib is full of local dialectic varieties and forgotten idioms. So much so, that it has been said to be without any grammar at all."

शिखांच्या ग्रंथसाहेबांतील नामदेवाचें संशोधन करण्याच्या बुद्धीनें मुंबई येथील शीख धर्म मंदिरामधील ग्रंथीजवळ ज्या वेळीं मीं पंजाबी भाषेचा अभ्यास सुरु केला, त्या वेळीं मॅक्समुल्लरनें वर म्हटल्याप्रमाणेंच माझी समजूत होती; पण पुढें मला प्रत्यक्ष अडचणी कळून आल्या. यासंबंधीं लिहितांना,

" It is necessary for the translator of the Sikh sacred writings to reside for long years in India, and work with the assistance of the few Jyanis or professional interpreters of the Sikh canonical writings who now survive. It would probably be an exaggeration to say that there are ten such men in the world," असें Sikh Religion या पुस्तकाचे लेखक मि. मॅकॉलिफ यानें म्हटलें आहे. यावरून या प्रयत्नाचा कठीणपणा कळून येईल. मॅकालिफच्या अगोदर इंडिया ऑफिसच्या हुकूमावरून Dr. Ernest Trump (म्युनिच वैश्विकाचे प्राच्य भाषांचे प्रोफेसर) यानें आदिग्रंथाचें भाषांतर केलें होतें व तें १८७७ सालीं प्रसिद्ध झालें आहे. यांत ३१ रागांपैकीं पहिले चार राग म्हणजे सिरि राग, राग माझ, राग गोडी व राग आसा इतक्यांचेंच भाषांतर आहे. बाकीच्या रागांमध्यें या रागांतील विचारांची पुनरुक्ति असल्यामुळें त्यानें भाषांतर केलेलें नाहीं. प्रो. ट्रंप हें काम पुरें करण्याकरितां १८७० सालीं पंजाबांत येऊन राहिला होता. त्यानें आपले अनुभव आपल्या आदिग्रंथाच्या सुरवातीला नमूद करून ठेवलेले आहेत, ते सांप्रदायिकांकडून जुन्या ग्रंथाची कितपत मदत होऊं शकते या दृष्टीनें विचार करण्यासारखे आहेत. तो लिहितो,

"After I had succeeded in engaging two Sikh Granthies at Lahore, I was not a little surprised, when they declared to me, that the Granth could not be translated in the literal grammatical way I desired. I soon convinced myself, that though they professed to understand the Granth, they had no knowledge either of the old grammatical forms or of the absolute words. They could only give me some traditional explanations, which frequently proved wrong, as I found them contradicted by other passages and now and then they could give me no explanation whatever; they had not even a clear insight into the real doctrines of the Granth. Other persons, who were recommeded to me for learning, I found equally ignorant. I went even to lay a number of difficult passages before some Granthis at Amritsar, but was likewise sorely disappointed." पुढें ग्रंथींच्या सहाय्यानें प्रथम तयार केलेलें भाषांतर त्यानें फाडून टाकलें; कारण त्यांच्यामुळें आपली दिशाभूल झाली असें आपल्या प्रत्ययाला आल्याचें तो लिहितो. पुढें संबंध ग्रंथ वाचून निरनिराळे कठीण शब्द व व्याकरणाचीं रुपें त्यानें टिपून घेतलीं व अशा प्रकारें आदिग्रंथाचें व्याकरण व कोश प्रथम तयार करून




अनुक्रमणिका

आपण भाषांतराला पुनः सुरवात केली, असें त्यानें लिहिलें आहे. वास्तविक अशा ग्रंथाचा अभ्यास करण्याची हीच शास्त्रीय पद्धति आहे. मॅकॉलिफ यानें या ट्रंपच्या पुस्तकासंबंधीं लिहितांना, His work is highly inaccurate and unidiomatic and furthermore gave mortal offense to the Sikhs by the odium theologicum introduced into it," असें म्हणून शीखांचा ग्रंथ, गुरु व पंथ यांची बदनामी करण्याची संधि त्यानें वायां दवडलेली नाहीं, असें अत्यंत खोडसाळपणाचें उद्गार काढलेले आहेत ! वास्तविक प्रो. ट्रंप याचा ग्रंथ जास्त पद्धतशीर, शास्त्रशुद्ध व प्रामाणिकपणाचा आहे असें मला आढळून आलें. शीखांची बदनामी करण्याचा त्याचा हेतु मुळींच नाहीं व तशी करण्यास तो एकादा मिशनरीही नाहीं. संशोधक या नात्यानें त्याला जें वाटलें तें त्यानें प्रांजलपणें लिहून ठेवलें आहे. भाषाशास्त्रज्ञ या दृष्टीनें प्रो. ट्रंप याची विद्वत्ता त्याच्या सिंधी भाषेच्या व्याकरणावरून चांगलीच प्रत्ययास येते. ( Grammar of the Sindhi language compared with the Sanskrit, Prakrit and the cognate vernaculars. London. 1872 ).याशिवाय Grammar of the Pasto or the language of the Afghans compared with the Iranians and North-Indian idioms, 1873, किंवा Sindhi Literature, Leipzig, 1866, हीं त्याचीं पुस्तकें पाहिलीं म्हणजे मॅकॉलिफनें त्याची केलेली संभावना अनुदारपणाची वाटते. स्वतः मॅकॉलिफ हा ज्युडिशियल खात्यांतील एक अधिकारी होता आणि त्याच्या ग्रंथाचा इमला मुख्यतः शीख ग्रंथींच्या ज्ञानावरच आहे. अर्थात त्या लोकांना मॅकॉलिफचे ग्रंथ पसंत पडावे यांत नवल नाहीं. या उलट डॉ. ट्रंपची योग्यता स्वयंसिद्ध असल्यामुळें त्यानें निर्भीड रीतीनें काढलेले उद्गार शीख ग्रंथींना झोंबणेही तितकेंच स्वाभाविक आहे. डॉ. ट्रंपचें भाषांतर यथार्थ आहे किंवा यथार्थ करण्याचा त्याचा प्रयत्न आहे, तर मॅकालिफच्या भाषांतरांत कसातरी भावार्थ साधलेला आहे. भाविक लोकांना भावार्थदीपिका पसंत पडली, तरी संशोधकांना यथार्थदीपिकाच मान्य होईल. डॉ. ट्रंपची प्रस्तावना अत्यंत मार्मिक व विद्वत्तापूर्ण आहे. आदिग्रंथाच्या भाषेसंबंधीं त्यानें केलेलें विवरण सर्वच वाचनीय आहे. तो म्हणतो,

"The general impression which we receive from the study of the Granth, is, that the grammatical forms of the language are not yet firmly fixed, but are rather in a state of transition, the genius of the language apparently endevouring to build up a new structure out of the ruins of the Prakrit, which has gone to pieces. We find therefore a number of forms promiscuously employed, as usage had not yet decided for a few select ones."

प्राचीन प्राकृत भाषा व आधुनिक देशी भाषा यांच्यामधील बोलींचे अवशेष आपणास ग्रंथसाहेबामध्यें आढळतात, आणि त्यांचा काळजीपूर्वक तौलनिक अभ्यास केल्यास आपणास मधला दुवा सांपडूं शकेल, असें प्रो. ट्रंपचें म्हणणें आहे. म्हणून ग्रंथसाहेबाचा भाषाशास्त्राच्या दृष्टीनें अभ्यास करणें हें केवळ एकट्या शिखांचें काम नसून आपणां सर्वांनीच या कार्याकडे लक्ष पुरविणें अगत्याचें आहे. ज्या नामदेवविषयक प्रश्नाचें संशोधन करण्याकरितां म्हणून प्रस्तुत निबंध लिहिला जात आहे, तो प्रश्न असा भाषाशास्त्रदृष्ट्या विचार झाल्यास सुटेल अशी मला आशा वाटते. तो कसा हें सांगण्यापूर्वी नामदेवाच्या ऐतिहासिक माहितीसंबंधानें थोडा विचार करावा लागेल.



### चरित्रविषयक आधार

नामदेवाच्या चरित्रविषयक माहितींत पुष्कळच घोंटाळा आहे व त्याविषयीं आतांपर्यंत पुष्कळ लिहिलें गेलें असल्यामुळें त्यासंबंधीं जास्त खोलांत शिरण्याची मला इच्छा नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बऱ्याच वर्षांपूर्वी भारद्वाज या टोपण नांवानें सुधारक पत्रांत एक लेखनमाला प्रसिद्ध झाली होती व तींत नामदेव हा ज्ञानेश्वराच्या समकालीन नाहीं, असें प्रतिपादन करण्यांत आलें होतें. त्याला ह. भ. प. श्रीपती र. भिंगारकर यांनीं केसरीमध्यें उत्तर दिलेलें प्रसिद्ध आहे[1]. नामदेवाचा काल अलीकडे ओढणाऱ्या भारद्वाजाच्या पक्षास डॉ. भांडारकर, प्रि. पटवर्धन वगैरे मंडळी आहे, तर भिंगारकरबुवांच्या पक्षाचे पांगारकर, भावे, आजगांवकर, आळंदीचे पांडुरंगशर्मा वगैरे गृहस्थ आहेत. यांपैकीं भिंगारकराप्रमाणेंच पांडुरंगशर्मांचे परिश्रम विशेष वाखाणण्यासारखे आहेत. दोनही पक्षांनी पुढें केलेले मुद्दे विचारार्ह असून पहिल्या पक्षाचा पुरस्कार जरी आज कोणी करीत नसले,तरी हा वाद कायमचा निकालांत निघाला, असें म्हणतां येत नाहीं.

नामदेवाच्या चरित्रविषयक जीं साधनें उपलब्ध आहेत, त्यांत मुख्य म्हणजे महिपतीचे ग्रंथ व मराठी भाषेंतील नामदेवाच्या चरित्रविषयक आढळणारे कांहीं अभंग होत. यांपैकीं भक्तविजय ग्रंथ, नाभाजी व उद्धवचिद्धन यांनीं जीं भक्तचरित्रें वर्णिलीं त्या "**दोहींचें संमत एक करून भक्तविजयो आरंभिला,**" असें महिपतीनेंच लिहिलें आहे.[2] भानाजीनें नामदेवासंबंधीं लिहितांना, "छीपा वामनदेव हरिदेवजूको भक्त बडो ताकी एक बेटी पतिहीन भई जानिये ! द्वादशवरषमांझ भयो तब कही पिता सेवा सावधानमन नीके करि आनिये ॥ तेरे जे मनोरथ हैं पूरणकरन येई जो पैदत्तचित्र ह्वैकै मेर, बात मानिये। करत टहल प्रभु वेगि ही प्रसन्न भये, कीनी काम बासना सपोषि उनमानिये । १२६ ॥ विधवाको गर्भ ताकी बात ठौर ठौर चली, दुष्ट शिरमौरनिकी भई मन भाइये। चलत चलत बामदेवजूके कान परि, करी निरधार प्रभु आप अपनाइये ॥ भयो जू प्रगटपाल नाम नामदेव धऱ्यो, कऱ्यो मन भायो सब संपति लुटाइये ! " अशी सुरवात करून यामध्यें महिपतीनें दिलेले बहुतेक नामदेवचरित्रविषयक सर्व प्रमुख चमत्कार उल्लेखिलेलें आहेत. नामदेवाच्या जन्मासबंधीं ही जी नाभाजी विलक्षण माहिती देतो, त्याची दुरुस्ती करण्याकरितांच तो भीमा नदींतील शिंपल्यांत सांपडलेला म्हणजे अयोनीसंभव अशी माहिती महिपतीनें दिली आहे कीं काय, अशी शंका येते. नाभाजीचा काल भिंगारकरांच्या मतें पंधरावें शतक आहे[3] तर द. ब. पारसनीस यांनीं तो इ. स. १५५८ ते १६७० असा दिला आहे[4]. भक्तमालेच रचनाकाळ इ. स. १५४२ असें म्हणतात.

श. १७५० सुमाराच्या धुंडिराज नरहरी मालू नांवाच्या कवीनें भक्तकथामृत नांवाचा एक ओवीबद्ध ग्रंथ लिहिलेला आहे. त्यांत नामदेवांच्या तीर्थयात्रेचें विस्तृत वर्णन आहे. यामध्यें त्याची कबीर (जन्म इ. स. १३९८), सेना (इ. स. १५ वें शतक),नानक (इ. स. १४६९-१५३९), तुळशीदास ( इ. स. १५३३ ते १६२३), दादू पिंजारी (जन्म इ. स. १५४४ ) नरसी मेहता (१४१५-१४८१),वगैरे भक्तांची भेट झाल्याचें लिहिलें आहे. फार काय पण नारदादि ऋषि व इंद्रादिक देव यांची भेट करविली आहे ! अशा पुस्तकाला इतिहासाच्या दृष्टया बिलकूल महत्त्व देतां येत नाहीं. हा ग्रंथ उद्धवचिद्घन व महिपति यांच्या ग्रंथांच्या

१ श्री ज्ञानेश्वरमहाराज ( कालनिर्णव सं. चरित्र ) स. १९००

२ भक्तविजय ( अ. १ ओवी २ ) भक्तलीलामृत ( अ.१ ओ. ६८ )

३ श्री ज्ञानेश्वर महाराज यांचा कालनिर्णय. पृ.. ६

४ नाभाजी उर्फ नाभादास.

५ भाइत इ. सं. मंडळ तृतीया संमेलन वृत्त शके १८३७ पृष्ठ,



आधारानें लिहिलेला आहे, असें नमूद आहे. महिपतीनें भक्तविजयाच्या १०-१२ अध्यायांत ही तीर्थयात्रेची हकीकत दिलेली आहे, आणि "हे तीर्थावळीची टीकासार" (अ. १२, ओ. २०६) असेंही स्पष्ट लिहिलें आहे.

नामदेवानें स्वतः लिहिले असें ज्यांच्यासंबंधीं म्हटलें जातें[६] ते आत्मचरित्रपर व तीर्थावळीचे अभंग अलीकडे कोणीतरी दुसऱ्यानें इ. सन १७ व्या शतकाच्या अखेरीला किंवा १८ व्या शतकाच्या प्रारंभीं लिहिलेले दिसतात. त्यांत दिलेली कांहीं माहिती म्हणजे उत्तरेकडील तीर्थाटण वगैरे गोष्टींना आधार असेल, परंतु ते आत्मचरित्रपर अभंग नामदेवाचे स्वतःचे नाहींत, ही गोष्ट रा. आजगांवकरांनाही कबुल आहे[७]. महिपती तीर्थावळीचे अभंग ज्ञानेश्वराचे असें समजत होता असें दिसतें. कारण,

**तीर्थावळींत साचार। स्वमुखें बोलिले श्री ज्ञानेश्वर। त्या वचनाचा धरूनि आधार। त्याही तैसेंचि निरूपिलें॥ ( १४-२२० )**

**ऐसें ज्ञानदेव वचन। तीर्थावळींत बोलिले। १५।१९९**

असे उल्लेख भक्तविजयांत आहेत. इ. स. १८६२ सालीं पि. स. अग्निहोत्री यांनीं "नामदेवकृत तीर्थावळीचे अभंग" या नांवाखालीं एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्याच्या शेवटीं म्हणजे ५७ व्या अभंगांत,

**हे सात्विकाचें धन। भोक्ते संतजन। ज्ञानदेवें पूर्ण ग्रंथ केला॥** असा मजकूर आढळतो.

येथें एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी ही कीं, तीर्थावळीचा कर्ता व महिपति या दोघांनांही ग्रंथसाहेबांतील नामदेवाची वाणी पाहिलेली असावी. कारण ग्रंथसाहेबांतील कांहीं वाक्यें तीर्थावळींत व भक्तविजयांत सांपडतात. ग्रंथसाहेबांतील गोंड रागांतील दुसरें व राम कलींतील पहिलें पद पाहावें ( हें इंग्रजी भाषांतरासहित वाचकांपुढें ठेवलेलें असल्यामुळें पुनः येथें देण्याचें कारण नाहीं. ) व त्याच्याशीं पुढील उताऱ्याची तुलना करून पाहा—

तीर्थावळी ( अग्निहोत्री, इ. स. १८६२ )

**ध्यान तया नांव निर्विकार नीकें। जे विश्वीं माझ्या देखे वीठोबासी॥ ७॥ अखंड हृदयीं तेची आठवण। साजीरे समचरण वीटेवरी॥ ८॥ नादीं लब्ध जैसे आसक्त हरण। जाय विसरोन देहभाव॥ ९॥ यापरी तल्लीन दृढ राखे मन या नांवे श्रवण आवडीचें॥ १०॥ वेवसाईं चित्त ठेऊनी कृपण। लाभाचेंची तन सर्वकाळ॥ ११॥ यापरी अखंड स्वहीत वीच्यारण। करीजे ते मनन सत्वशीळ॥१२॥ परपुरुषीं जैसे आसक्त व्यभिच्यारीणी। नलगे तीच्या मनीं काम धाम॥ १३॥ ( अभंग १५ ).**

**धेनु वसे वनीं वत्स असे घरीं। चित्त तयावरी ठेऊनी चरे॥ ते तया देखोनी संतोषली मनीं। तैसा तुझ्या गुणी वोल्हावलों॥ ( अभंग १९ ).**

भक्तविजय ( अध्याय १० ).

**आतां कैसें कवण श्रवण। स्वामीनीं पुसिलें मज कारण। जेवीं नादलुब्ध होऊनि हरण। जाय विसरोनि देहभाव॥ १४१॥ तया रितीं तल्लीन मन। करुनी ऐकावें हरिकीर्तन। श्रवणभक्ति याच कारण। म्हणती सज्ञानी अनुभवी॥ १४२॥ व्यवहारी ठेउनिया चित्त। कृपण जैसा द्रव्य संचित। त्याच रितीं विचारी स्वहित। मनन निश्चित या नांव॥ १४३॥ आतां निदिध्यास तो कैशा रितीं। जैसी परपुरुषीं लावुनी प्रीति। जारिणी मंदिरीं रहाटती। लौकिक स्थिति सारिख्या॥ १४४॥ कीं धेनु चरत असतां डोंगरीं। परी चित्त ठेविलें वत्सावरी। कीं मन ठेवोनी द्रव्यावरी कृपण बाजारीं हिंडतसे॥ १४६॥ नातरी चित्त ठेवूनि चोरीवर। सोनार घडिती अलंकार। कीं दूरी असोनि चकोर। रोहिणीवरी लक्षिती॥ ४७॥ कीं कुंभ ठेवोनि शिरावरी। मोकळ्या हातीं चालती नारी। लक्ष ठेवोनी दुडियेवरी। लोकाचारीं बोलत॥ ४८॥**

६ मराठी वाङ्मयाचा इतिहास. खं. १ पृ. ५७७

७ नामदेव चरित्र १९२७, पृ. २.






अनुक्रमणिका

सोनाराची किंवा घागरवाली बाईची उपमा मूळ ग्रंथसाहेबांत आहे, परंतु तीर्थावळींत ती दिसत नाहीं. महिपतीनें ती दिलेली आहे. तीर्थावळी महिपतिपूर्व आहे. यावरून महिपतीनें ग्रंथसाहेबांतील नामदेवाची 'बाणी' पाहिली असावी हें उघड ठरतें. नामदेवाचा काल भिंगारकबुवा म्हणतात त्याप्रमाणें पंढरपूरच्या त्याच्या घराण्यांतील जुन्या वह्यांत जर चरित्रपर अभंगांत दिल्याप्रमाणें,

> **अधिक ब्याण्णव गणित अकरा शतें ।**
> **उगवतां आदित्य तेजोराशी ॥**
> **शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार ।**
> **प्रमोद संवत्सर शालिवाहन शक ॥**

असा खरोखरीच असेल तर नामदेवाचा काल अलीकडे ओढण्याचें विशेषसें कारण नाहीं. भारद्वाजादि विद्वानांना नामदेवांचा काल अलीकडे आणण्यास हे अभंगच विशेषतः कारण झालेले दिसतात.

### पंजाबांतील जन्मसाखी.

पंजाबांतील नामदेवसांप्रदायी लोकामध्यें " श्री स्वामी नामदेव की जनमसाखी " या नांवाचा बावा पुरणदास यानें लिहिलेला सुमारें ५५१ पृष्ठांचा ग्रंथ असल्याचें " एक महाराष्ट्रीय " या लाहोर येथें वास्तव्य करणाऱ्या विद्वानानें लिहिलेलें आहे.[८] त्यांत नामाजीचीच माहिती विशेषतः आढळतेः–

" या जन्मसाखींतील हकीकतीप्रमाणें नामदेवांचे आजे ( आईचे वडील ) बामदेव नांवाचे एक भगवद्भक्त असून त्यास लक्ष्मावती नांवाची कन्या होती. ती बालविधवा असून आपल्या बापाप्रमाणेच भगवद्भक्त होती. एकदा श्रीकृष्ण ब्राह्मणरूपानें बामदेवाच्या घरीं गेले व त्यांनीं लक्ष्मावती नमस्कार करावयास आली तेव्हां तिला ' पुत्रवती भव ' असा आशीर्वाद दिला. त्या आशीर्वादाच्या प्रभावानें तिला पुत्र झाला व तेच संत नामदेव होत. अशा तऱ्हेच्या भाविक लोकांच्या मनांवर परिणाम करणाऱ्या पुष्कळ गोष्टी या ग्रंथांत आहेत. तथापि नामदेव हे महाराष्ट्रांतील पंढरपूरकडील राहाणारे व त्यांचें पूर्वायुष्य महाराष्ट्रांत गेलें ही गोष्ट या ग्रंथांत स्पष्ट दिलेली आहे. नामदेव हे लक्ष्मावतीला वैधव्यावस्थेंत असतांना ईश्वरप्रसादानें झाले असें जरी वर्णन जन्मसाखींत आलें आहे, तरी लक्ष्मावतीचा विवाह दामाजीशीं झाला होता, हीहि गोष्ट त्यांत नमूद केलेली आहे. जन्मसाखींत भगवद्भक्त ज्ञानदेव हे नामदेवाचे गुरु होते असा उल्लेख आहे. (ही माहिती नाभाजीच्या भक्तमालेंतही आहे). तसेंच नामदेवांनीं केलेल्या चमत्कारासंबंधीं दक्षिणेंत विशेष प्रसिद्ध असलेल्या कथा...जन्मसाखींतील चरित्रांत आल्या आहेत. परंतु तींत दिलेला नामदेवांच्या जन्माचा व मृत्यूचा काल आणि महाराष्ट्रांत सामान्यतः मानला जाणारा काल ह्यामध्यें मात्र फार अंतर आहे: "

| | | |
|---|---|---|
| जन्मसाखी–नामदेवाचा | जन्म शके | १२८५ |
| महाराष्ट्र:— ,, | ,, ,, | ११९२ |
| | अंतर | ९३ |
| जन्मसाखी नामदेवाचा | मृत्यु शके | १३८६ |
| महाराष्ट्र:— ,, | ,, ,, | १२७२ |
| | अंतर | ११४ |

संत नामदेव यांच्या पंजाबांतील निवासासंबंधीं इकडील चरित्रांत उल्लेख नाहींत. परंतु उपरिनिर्दिष्ट जन्मसाखी व इतर पंजाबी ग्रंथांमध्यें असें लिहिलें आहे कीं, नामदेव " एकटेच " तीर्थयात्रा करीत द्वारका, मथुरा हरद्वार वगैरे ठिकाणीं फिरत फिरत पंजाबांत गेले. तेथें भूतपिंड गांवीं अड्डोली नांवाची एक गरीब विधवा स्त्री होती. तिचा एकुलता एक मुलगा वारला असतां नामदेवानीं परमेश्वराची प्रार्थना करून त्याला जीवंत केलें. तो पुढें नामदेवाचा पट्टशिष्य म्हणून प्रसिद्ध होऊन नामदेवाच्या मागून त्या "बहोरदास यांची त्यांच्या गादीवर स्थापना झाली. " घुमान येथें जी नामदेवाची समाधी व

८ पंजाबांतील नामदेवसांप्रदाय ( लोकशिक्षण, वर्ष ५, अं ११. पृ. ५९०.)



देवालय आहे त्यांची व्यवस्था अद्यापि बहोरदासांच्या वंशजांकडेच आहे.

नामदेवानें अनेक चमत्कार करून जल्लो, लद्धा, केसो वगैरे अनेक शिष्य जमा केले व सुमारें अठरा वर्षें घुमान येथें घालविलीं. नामदेव पंढरपुरास समाधिस्थ झाल्याची हकीकत महाराष्ट्रांतील ग्रंथांत प्रसिद्ध आहे. घुमान येथेंही त्याची समाधी आहे. या दोहोंची सांगड घालण्याकरितां पंजाबांतील एका जन्मसाखींत असें लिहिलें आहे कीं, नामदेव आपला भौतिक देह घुमान येथेंच ठेवून दिव्य स्वरूप धारण करून पंढरपुराला गेले आणि तिकडे समाधिस्थ झा कांहीं ग्रंथकारांच्या मतें पंजाबांतील ही समाधी दुसऱ्या कांहींतरी 'निशाणी'वर बांधिली असावी. श्री. महाराष्ट्रीय यांनीं दिलेल्या माहितीचा जवळ जवळ त्यांच्याच शब्दांत वरील सारांश आहे.

मला असें वाटतें कीं, ज्या एकाद्या जुन्या जन्मसाखीवरून नाभाजीनें नामदेवाची माहिती घेतली आहे, तिच्यामध्यें महाराष्ट्रांतील माहितीची भर घालून अलीकडे लिहिलेली ही पुरणदासकृत जन्मसाखी असावी. नामदेवाच्या दोन समाधींचा निरास वरीलप्रमाणें केला, तरी त्याच्या जन्माच्या व मृत्युच्या दोन तिथींचा कसा मेळ घालावा, हा प्रश्न शिल्लक राहातोच. महाराष्ट्रांतील प्रचलित काल भारद्वाजादि विद्वान म्हणतात त्याप्रमाणें अलीकडे ओढल्यास किंवा पंजाबकडील काल मागें ढकलल्यास पंजाबी नामदेव व महाराष्ट्रीय नामदेव यांचा मेळ घालतां येईल. परंतु तसें करण्यास आपल्याजवळ भरीव असा पुरावा नाहीं. एकंदर गोष्टीचा शांतपणें विचार केल्यावर मला असें वाटूं लागलें आहे कीं, पंजाबमध्यें गेलेला नामदेव आपल्याकडील आद्य नामदेव नसून त्यांचाच अनुयायी म्हणविणारा आणि म्हणूनच नामदेव असें आपल्या गुरुचें नांव धारण करणारा नामदेवाचा पंजाबी प्रशिष्य असावा. (अशी पद्धती पूर्वींची होती यासंबंधीं जास्त विवेचन पुढें येईल). शिखांच्या ग्रंथसाहेबांत जीं पंजाबी पदें आहेत तीं याच नामदेवपंथीं महंतांनीं लिहिलीं असावीं. इतकेंच नव्हे तर गाय जिवंत केल्याचे वगैरे जे चमत्कार आहेत त्यापैकीं कांहींचा तरी उगम उत्तरेकडील असावा. गाय सजीव केल्याचा चमत्कार भक्तविजयांत हस्तनापुरांत घडल्याचें (अ. १०) लिहिलें आहे, तर दक्षिणेंत बेदर येथें घडल्याचें वर्णन संतलीलामृतांत दिलेलें आहे (अ. २८). जन्मसाखींत हा प्रकार दिल्लीला घडल्याचें नमूद आहे. महाराष्ट्रांत नामदेवाच्या चरित्रविषयक जी माहिती लोकांत प्रसिद्ध आहे, त्याला मुख्यत्वें महिपतीचेच ग्रंथ कारण आहेत. नाभाजीचा भक्तमाल ग्रंथही पूर्वीपासून महाराष्ट्रांत परिचित होता, असें दिसतें. भक्तमाल ग्रंथाच्या अगोदर लिहिलेल्यां ग्रंथांत जे चरित्रविषयक चमत्कार असतील त्यांना निःशंकपणें भक्तमालेचा आधार नाहीं, असें म्हणतां येईल. तीर्थावळीच्या अभंगांत कूपांतून पाणी येतें याव्यतिरिक्त दुसरे महत्त्वाचे प्रकार नाहींत. प्रो. ट्रंप याला महाराष्ट्रांत जे अभंग आहेत तीं नामदेवाच्या पदांची भाषांतरें तर नाहींत ना, अशी शंका आलेली दिसते. परंतु एकनाथांनीं (श. १४७०–१५२१) आपल्या भागवताच्या आरंभीं

वंदू प्राकृत कवीश्वर। निवृत्ति प्रमुख ज्ञानेश्वर ॥
नामदेव चांगदेव चतुर। ज्याचें भाग्य थोर गुरुकृपा॥

(अध्याय १ ओ. १२१) असें म्हटलें आहे. त्यावरून ह्या शंकेस जागाच राहात नाहीं. भक्तमाल ग्रंथामध्येंही 'पंढरी'चा उल्लेख आहे. ट्रंप म्हणतात तसा प्रकार अशक्य असतो असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ नामदेवाच्या गाथेंत सेना न्हाव्याचे म्हणून सोळा अस्सल मराठी अभंग दिलेले आहेत. वास्तविक सेना हा भगवद्भक्त महाराष्ट्रीय नाहीं असें दिसतें. सेनाचें एक पद शिखांच्या आदिग्रंथामध्यें आहे. सेना पूर्वी बांधवगड म्हणून प्रसिद्ध असलेल्या सह्यांच्या मध्य हिंदु-

९ तुकाराम तात्या. इ.स.१८९४ अभंग १३९-४७



स्थानांतील रेवा संस्थानांतील राजा रामाच्या पदरीं न्हावी होता व तेव्हांपासून बांधवगडमध्यें सेनाच्या संप्रदायांतील न्हावी जवळ ठेवण्याचा राजदरबारचा प्रघात पडला, अशी हकीकत मॅकॉलिफ देतो.[१०]

नाभाजीनें[११] व बहुतेक त्याच्याच आधारानें महिपतीनें[१२] सेनाची कथा दिलेली आहे. सेना हा रामानंदाचा शिष्य होता. सेना न्हाव्याचे मराठींत १५० अभंग उपलब्ध असल्याचें ह. भ. प. पांगारकर लिहितात.[१३] त्यांच्याही म्हणण्याप्रमाणें सेना हा पंढरीचा वारकरी आहे. सेनाचा निर्देश ज्याला महिपति रोहिदास चांभार म्हणतो, त्या रविदासाच्या ग्रंथसाहेबांतील एका पदांत आहेः

नामदेवकबीरुतिलोचनु सधना सैनु तरै ।

—राग मारू

सेना हिंदुस्थानी कीं दक्षिणी हें कोडें कोणी उकलील काय ?

### ग्रंथसाहेबांतील अन्तर्गत पुरावा

ग्रंथसाहेबांत जीं नामदेवाचीं पद्यें आहेत त्यांवरून त्याच्यासंबंधीं काय माहिती मिळते ती पाहूं (१) नामदेव हा जातीनें 'छीपा' होता. (आसा पद ५; भैरउ प. ६). परंतु छीपा म्हणजे आपल्याकडील शिंपी(Tailor) नसून छीपा(printer) असा आहे. त्याचा अर्थ Calico-printer असा करण्यांत येतो. अलीकडे या जातीला पंजाबांत 'छींबा' या नांवानें संबोधितात. शिंवणारा तो शिंपी तसा छापणारा तो छीपा. छापणें या शब्दाचा उगम निश्चितपणें सांगतां येत नाहीं. परंतु छपचें (सं. चप्) छिप असें भाषाशास्त्रप्रमाणें रूप होऊं शकतें. छीप याचा अर्थ छापणें अशा अर्थी या नामदेवाच्याच पद्यांत आला आहे. "बसै घटाघट लीपन छीपै" (कानडा प.१). परंतु रंगविण्याप्रमाणें कातरणें व शिवणें ही ही कामगिरी या जातीकडे होती, असें दिसतें. "मनु मेरे गजु जिहवा मेरी काती रांगनि रांगाउ सीवनि सीवउ।... सुइनेकी सुई रूपेका धागा ।" (आसा, प. ३). आपल्या जातीला तो हीन म्हणतो."हीनडी जात मेरी जादम राइआ । छीपेके जनमि काहे कउ आइआ" (भैरउ प. ६). रोहिदास चांभारानें ग्रंथसाहेबांतील पदांत त्याचा "आछोप छीपा" (untouchable calico-printer) असा उल्लेख केलेला आहे. (मल्हार). नामदेवांच्या मराठी गाथ्यामध्यें असेच कांहींसे उल्लेख आहेतः " यातिहीन शिंपी अधिकारी कैंचा. " (७२१). आम्हीं दीन शिंपी इये यातिहीन " (७२२).[१४] (२) नामदेवाच्या हातचें " गोविंद " दूध पितो. (भैरउ प. ३); भक्त. वि. अ. ४. नाभाजीच्या भक्तमालेंत असाच निर्देश आहे. (पृ. ८०). महिपतीनें नामदेवाच्या हातचा पांडुरंगानें नैवेद्य घेतला, अशी कथा दिली आहे. (३) मंदिर फिरतें. (भैरउ प. ६); भक्तमाल (पृ. ८३) व महिपति (भक्त वि. अ. १२) अशीच माहिती देतात. (४) देव सुतार होऊन नामदेवाची झोंपडी दुरुस्त करतात. (सोरठ, प. २); भक्तमाल (पृ. ८५); भक्तविजय. अ. २१ त देव नामदेवाचें छप्पर शाकारतात. (५) नामदेव सुलतानाची गाय जीवंत करतो. (भैरउ प. ११); भक्तमाल (पृ. ८२); महिपति ही कथा भक्तविजयांत (अ. १०) व संतलीलामृतात देतो. (अ. २८). (६) ग्रंथसाहेबांतील नामदेवानें ईश्वराला 'बीठुला' असेंही संबोधिलें आहे.

याशिवाय ग्रंथसाहेबांतील इतर भक्तांच्या वाणीमध्यें नामदेवासंबंधीं जे नामनिर्देश आहेत, त्यांचाही विचार करणें जरूर आहे.

(अपूर्ण) —अ. का. प्रियोळकर.

१० The Sikh Religion. Vol. VI. Pg 120,121.

११ भक्तमाला. पृ. १५७-१५८.

१२ भक्तविजय. अ. ३४.

१३ मराठी वाङ्मयाचा इतिहास खं. १, पृ. ६४०

१४ नामदेवच्या अभंगाची गाथा (तुकाराम तात्या)





अनुक्रमणिका

# आधुनिक रशियाचें राज्ययंत्र

रशियासंबंधानें आजकाल इतकें लिहिलें जात आहे व त्यांतील राज्यपद्धतीच्या घातुक प्रकाराविषयीं इतक्या गोष्टी आपल्या कानावर आदळत आहेत कीं, एखाद्यानें रशियासंबंधीं कोणत्याही गोष्टीची माहिती सांगण्याचा प्रयत्न केला, तर "महाराज, हात जोडतों, पण रशियाची गोष्ट बोलूं नका," असें सांगण्याची पाळी येते. त्याशिवाय १९१७च्या नोव्हेंबरांतील राज्यक्रांतीनंतर सर्व पाश्चात्य राष्ट्रांनीं जणूं काय गुप्त कट करून रशियाला पाण्यांत पाहण्याला सुरुवात केली व सर्व सुधारणेची होळी तेथें होत आहे, अशा रीतीचें अकांडतांडव गेल्या अठरा वर्षांत केलें आहे. त्यामुळें इतक्या गोष्टींनंतर रशिया शाबूत आहे, रशियाची आर्थिक योजना यशस्वी होत आहे, जगाच्या बाजारांत त्याच्या शब्दाला किंमत आहे, त्याच्याशीं निरनिराळ्या राष्ट्रांचे व्यापारी संबंध होत आहेत, राष्ट्रसंघाचा तो सन्मान्य सभासद झाला आहे, वगैरे गोष्टी पाहून आपला आपल्या डोळ्यांवर व कानावर विश्वासच बसत नाहींसा झाला आहे. आणि ही शक्य कोटींतील गोष्ट आहे काय, असा कुतूहलपूर्वक आश्चर्योद्गार काढून प्रश्न चर्चिला जात आहे. आपणास इतका वेळ ज्या ज्या हकीकती, अत्यंत विश्वासू व मुद्दाम पाठविलेल्या वार्ताहरांनीं सांगितल्या, त्या निव्वळ गप्पाच तर !

ज्यांना एकतर्फी चाललेल्या पाश्चात्य राष्ट्रांच्या प्रोपागँडावरूनच कल्पना करावयाची असेल, त्यांना रशियन् राज्यक्रांतीनंतरच्या काळाची कांहींच कल्पना यावयाची नाहीं. "Give a dog bad name and hang him," (कुत्र्याला पिसाळला आहे असें म्हणा व गोळी घाला.) अशी पाश्चात्य राजनीति आहे, आणि त्यामुळें रशियन राज्यपद्धति, समाजनीति व आर्थिक परिस्थिति यांविषयीं आपल्याला संपूर्ण ज्ञान नाहीं. आपलीं मतें अर्ध्याकच्च्या व अपुऱ्या माहितीवरून बनविलेलीं असतात, व म्हणून तीं चुकीचीं ठरतात. प्रत्येक प्रश्नाला दोन बाजू असतात आणि आपल्याला जी दिसली असेल, ती एकच बाजू असेल, आणि दुसरी बाजू तितक्याच महत्त्वाची, तितकीच जोरकस, किंबहुना जास्त मुद्देसूद व परिणामकारक असेल, हें लक्षांत ठेवून आपण आपलें मत बनविलें पाहिजे. आजकाल जी आपली अवस्था झाली आहे, ती कोणी तरी आपणास "बनविलें" व अप्रस्तुत व एकपक्षीय माहिती आपणाला पुरविली या जाणीवेनें फारच अनुकंपनीय झाली आहे. ही खरी कीं ती खोटी, हें न्याय्य कीं अन्याय्य याचा आपल्याला उलगडा होत नाहीं. "शिष्यस्तेहं, शाधि मां त्वां प्रपन्नम्।" असें म्हणणाऱ्या व दिङ्मूढ झालेल्या अर्जुनाप्रमाणें आपली अवस्था झाली आहे. त्यानें जसें "निश्चितं ब्रूहि तन्मे" असें श्रीभगवान् कृष्णाला म्हटलें, तशीच माहिती आज आपल्याला मिळवावयाची आहे.

### विश्वव्यापि रशिया

मतामतांतराच्या गलबल्यांतून जरा दृष्टि साफ करून युरोप खंडाच्या पूर्व भागाकडे नजर फेंकली, तर आपणाला असें दिसून येईल कीं, या भागाला एकजात पिवळा रंग फांसला आहे व तो तसाच आशिया खंडाच्या उत्तर भागाला देऊन पीत समुद्रापर्यंत मिळविला आहे. या अपरंपार पसरलेल्या देशामध्यें नाना वर्णांचे व नाना पंथांचे लोक आढळतात. नाना तऱ्हेच्या सृष्टिचमत्कारांचे व निरनिराळ्या वायुमानाच्या प्रकारांचे देश व विभाग आढळतात. अत्यंत रानटी अवस्थेंतील लोकांपासून तों अत्यंत सुधारलेल्या विचाराचे व आचाराचे लोक दिसून येतात. भटक्या मारणाऱ्या नोमॅडिक टोळ्यांपासून तों मास्कोमधील उच्च वातावरणांत व ललित वाङ्मयांत रममाण होणारे रसिक दिसून येतात. फुलें, फळें, वन्य पशु, जमिनीवरील व समुद्रामधील




अनुक्रमणिका

अस्वलें, हरणें, सील वगैरे प्राणी या पूर्व-पश्चिम पसरलेल्या प्रदेशामध्यें वास्तव्य करितात. हा प्रदेश इतका अफाट पसरलेला आहे कीं, आपल्या दृष्टीची फेक पोंचत नाहीं, व नकाशावर सुद्धां पाहाण्याला कंटाळाच नव्हे, तर तिटकारा येतो. लहान मुलांना तर या नकाशामध्यें लहान लहान राष्ट्रांना हिरवे, तांबडे, तपकिरी वगैरे रंग भरण्यापेक्षां एकजात पिंवळ्या रंगाची सफेती करणें फार आवडतें. आणि तसेंच समुद्राचा निळा रंग देणें हेंही काम ते मनापासून करितात ! रशिया, हिंदुस्थान व चीन हे देश जगांतील सर्वांत मोठे व त्यांच्या सुखदुःखावर जगाचें भवितव्य अवलंबून असूनही जगाच्या बाजारांत त्यांना असावी तितकी किंमत नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट होय !

रशियाचा अफाट विस्तार त्याच्या अज्ञानावस्थेला व राजकीय जुलुमाला कारणीभूत झाला, असेंच एकंदर हकीकतीवरून दिसून येतें. प्राचीन ग्रीक लोक रशियाला " Outer darkness ( सीमांधःकार ) या नांवानें ओळखीत असत. प्राचीन आर्यांची एक शाखा (" स्लाव्ह" या नांवानें ओळखिली जाणारी ) युरोपमध्यें घुसली व कार्पेथियन पर्वत ओलांडून पलीकडील भागांत पसरली. दुसरी शाखा दक्षिण प्रदेशांत जात जात हल्लींच्या सव्हर्स्, क्रोटस्, स्लोव्हन्स् इत्यादिकांना जन्म देती झाली. कांहीं याहीपुढें युक्रेनियाच्या प्रदेशांत जाऊन फिन्स लोकांत मिसळून गेले, तर कांहीं तार्तरी व मोंगोलियन, रशियन् ( ठेंगू ) अथवा युक्रोनियन्स् या नांवानें ओळखिले जाऊं लागले.

पश्चिमेकडे गेलेल्या ग्रेट रशियन्सचा उत्कर्ष झाला व त्यांनींच रशियाचें साम्राज्य अस्तित्वांत आणिलें. उरल समुद्रापर्यंत ते गेले, काकेशियस पर्वत त्यांना रोखून धरण्यास असमर्थ झाला आणि सैबेरियाच्या पाणथळ व दलदलींचा प्रदेश त्यांना अडवूं शकला नाहीं. इतकेंच नव्हे, तर गोबीचें ओसाड व रखरखीत मैदान आणि बर्फाच्छादित प्रदेशही पायाखालीं घालून धाडसी रशियन इ. स. १६३९ पर्यंत पॅसिफिक महासागरपर्यंत आले, तो महासागरसुद्धां त्यांच्या प्रगतीला प्रतिरोध करूं शकला नाहीं ! ते पलीकडे गेले, अलास्कांत शिरले व अमेरिकेंत स्थायिक झाले. इ. स. १८६७ पर्यंत हा प्रांत रशियाच्या ताब्यांत होता, व नंतर तो अमेरिकेला विकण्यांत आला. मोठे रशियन् ठेंगू अथवा लहान रशियन युक्रेनियन्स्, फिन्स, ज्यू, लेटस् व पोल्स या त्यांच्या पूर्वींच्या जातींत आशियामधील तार्तरी, बश्किर्स, उझ्बेग्, मंगोलियन व तुर्कोमन यांची भर पडली. अशा कित्येक जातींची खिचडी या साम्राज्यांत झालेली आहे; त्यांची संख्या १८५ असून निरनिराळ्या १४७ भाषा त्यांच्यांत बोलल्या जातात.

जगामधील एकंदर लोकसंख्या २०० कोटी आहे. $\frac{१}{४}$ युरोपांत आहे व $\frac{१}{१५}$ उत्तर अमेरिकेंत आहे. निम्याहून अधिक लोकसंख्या आशियाखंडांत आहे. चीनमध्यें ४४° कोटी व हिंदुस्तानांत ३५ कोटी, तर रशियाची लोकसंख्या १५॥ कोटी आहे. रशिया वगळला, तर युरोपची लोकसंख्या ५.५॥ कोटींपेक्षां जास्त होणार नाहीं. यावरून रशियाच्या अवाढव्यपणाची व अगणित मनुष्यसंपत्तीची कल्पना येईल. याच शक्तीच्या जोरावर रशियाचा अफाट विस्तार झाला.

## मध्ययुगीन काल

पूर्वी सरदार, जमीनदार व श्रीमंत वर्गाची सत्ता रशियाच्या अंतर्भागांत सुरू होती. त्यांत राज्यकारभाराचे सर्व प्रकार—पूर्ण अनियंत्रित राजसत्तेपासून तों मध्यवर्गीय व श्रीमंतवर्गीय सत्ता—कांहीं ठिकाणीं

१ A History of Russia—G. Vernadsky ( New Heaven 1929, Ch 1. ) " Russia from the Verangians to the Bolsheviks" —Oxford 1918 by Beazley, Forbes & G. A. Birkett.



दिसून येत असत. रोमन साम्राज्याचा सुप्रसिद्ध नेता सीझर याच्या नांवाचा अपभ्रंश "झार" असा आहे व तीच पदवी रशियांतील राजांनीं आपल्या नांवाला जोडली. "४ था आयव्हन्" (Ivan IV) हा राजा १६ व्या शतकांत होऊन गेला. पण त्याचा एवढा दरारा होता कीं, त्याला The Terrible हेंच विशेषण लावतात. त्यानें लहान लहान सरदारांना व स्वतंत्र बनूं पाहणाऱ्या जमीनदारवर्गाला भरडून काढून एकतंत्री राजसत्ता प्रस्थापित केली व अनियंत्रित राजसत्तेचा पाया दृढमूल केला.

"आयव्हन"च्या कारकीर्दींत राजसत्ता बद्धमूल झाली; तथापि त्यानें राष्ट्रीय प्रातिनिधिक सभा ("Zemski Sober ") ही १५५० त बोलाविली. लोकांना फारसे हक्क वगैरे नव्हतेच; परंतु लोकमताचा पाठिंबा असल्यास आपल्याला वाटेल त्याप्रमाणें राज्यकारभार करतां येईल ही, त्याची भावना होती. इंग्लंडमधील तत्कालीन टयूडर राजे अनियंत्रित राजसत्ता गाजवीत होतेच कीं नाहीं ? स्टुअर्ट राजेसुद्धां "राजा हा ईश्वरी अंश आहे" व "राजपद" ही ईश्वरी देणगीच होय या मतांचा उच्चार करीत होते. त्या वेळीं मागसलेल्या रशियांत प्रातिनिधिक सभा–'झेमस्कीय सोबर'–ही अस्तित्वांत आली हेंच विशेष आहे. या सभेत तसा अर्थ नव्हताच; लोकांच्या नांवावर सरदार व जमीनदार वर्ग आपली संघटना करूं पाहात होता. त्यामुळें लोकांच्या हिताच्या दृष्टीनें पाहातां या सभेचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

इ. स. १६१३ मध्यें अशीच दुसरी एक सभा निर्माण झाली व तिनें रॅमनोव्ह (Ramanov) राजघराण्याला पैसे गोळा करण्याला मदत केली. या सभा वरचेवर बोलाविल्या जात असत. तथापि पार्लमेंटप्रमाणें या संस्थेला योग्य तऱ्हेचे प्रातिनिधिक हक्क नसत. राजाच्या कलाप्रमाणें राज्यकारभार चालला पाहिजे हें मुख्य तत्त्व होतें. राष्ट्रीय भावना अगर लोकमतानुवर्ति राज्यकारभार ही भावनासुद्धां अस्तित्वांत नव्हती. राजावर नियंत्रण घालणें बाजूलाच राहिलें, मग विरोध करणें कोठलें ? नवीन राजा गादीवर येण्याला त्याला या सभेची मदत लागली; पण पुढें या सभेला कोणत्याच तऱ्हेचा–सल्लासलामती-खेरीज अधिकार नव्हता.

राज्ञी ॲन्नें (Anne) राजकीय अधिकार एका मंत्रिमंडळाला देण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें एक मसुदा तयार करून त्यावर 'स्वाक्षरी' केली. परंतु या सभेनें, लोकांची इच्छा पूर्वीप्रमाणेच राज्यकारभार सुरू असावा अशी आहे असें कळविलें ! तेव्हां तिनें तो कागद फाडून टाकला ! अशा रीतीनें पुन्हा अनियंत्रित राज्यपद्धति सुरू झाली. ही गोष्ट इ. स. १७३० मधील होय.

पुढें दुसऱ्या कॅथराइन्नें (Catherine II, 1762-96) "ग्रँड कमिशन" (Grand Commission ) ही ५६४ सभासदांची सभा निर्माण केली. या सभेकडे नवे निर्बंध करण्याचें व जुन्यांची दुरुस्ती करण्याचें काम होतें; परंतु या सभेला राजकीय हक्क किंवा प्रातिनिधिक स्वरूप नसल्यामुळें तिच्या कामांत एकसूत्रीपणा आला नाहीं व तें काम तसेंच अर्धवट सोडून द्यावें लागलें. लोकांमध्यें असंतोष माजत होता; पण त्याला बाहेर पडण्याला कोठेंच वाव नसे. अनियंत्रित राजसत्तेचा हाच मोठा दोष आहे कीं, त्या सत्तेपुढें प्रतिस्पर्धि अगर दुसरा पक्ष निर्माण होऊं शकत नाही. निर्माण झाला तरी त्याला कायमचा नष्ट करणें सुलभ होतें. उघडपणें काम करण्याला मिळालें नाहीं, म्हणजे मनुष्य चोरून अंधारांत–तळघरांत कामें करूं लागतो. असंतोष वाढत चालला, म्हणजे राष्ट्रातील घटक एकमेकांजवळ विशेष रीतीनें आकर्षिले जातात, व प्रतिरोधाची शक्ति वाढत जाते. या परिस्थितीवर वेळीच उपाय झाला नाहीं, म्हणजे राष्ट्रांतील तरुणांत क्रांतीचें वातावरण उत्साहानें खेळूं लागतें. त्यांच्या उत्साहाला वाव मिळाला



नाहीं, म्हणजे त्यांचें लक्ष स्वाभाविकपणें राजकीय उन्नतीकडे वळतें व अशा रीतीनें राजकीय चळवळीचा अंतिम परिणाम क्रांतिकारक होतो.

इ. स. १८०१ मध्यें १ ला ॲलेक्झेंडर गादीवर आला. त्याच्या अमदानींत पुन्हा एकदां कारभार सुधारण्याची लाट उसळली. परंतु "देव देतो, पण कर्म नेतें" असाच अनुभव रशियन लोकांना आला व ती लाट मध्येंच गडप झाली! कोणत्याही तऱ्हेच्या सुधारणा लोकांना मिळाल्या नाहींत. पुढें दुसरा अलेक्झँडर (इ. स. १८५५–८१) यानें सुधारणा देण्याचा निश्चय केला; परंतु दुर्दैवानें त्या राजाला खुनशी कट्यारीला बळी पडावें लागलें व सुधारणा लांबणीवर पडल्या. नाहीं तर चोवीस तासांनंतर तो सुधारणेचा निर्बंध कदाचित् अमलांत आला असता. एका दुष्ट माथेफिरूनें राजाच्या पाटींत खंजीर खुपसला! त्याच्या हयातींत मात्र एक सुधारणा झाली[2]. त्यानें सर्व गुलामांना मुक्त केलें, आणि १८६४ मध्यें दोन प्रातिनिधिक संस्था गांव व जिल्हा यांकरितां निर्माण केल्या. आपापला कारभार त्यांनीं पाहावयाचा व रस्ते व नाले, पूल व शाळा व इतर सार्वजनिक गोष्टींवर देखरेख ठेवावयाची असें ठरविण्यांत आलें. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस रशियाच्या कांहीं प्रांतांच्या स्थानिक कारभाराची सुधारणा झाली.

तिसऱ्या ॲलेक्झँडरच्या अंमलापर्यंत (सन १८८१–९४) गांवांना (mirs) स्वतंत्रतेचे हक्क होते; पण पुढें हे गांव जमीनदारवर्गानें वापरण्याला घेतले, तेव्हांपासून या जमीनदार लोकांनीं कुळांना व शेतकऱ्यांना जाच सुरू केला.

## दुसरा निकोल (झार)

विसाव्या शतकांत सुद्धां रशियांत "झारशाही"–अनियंत्रित राजसत्ता–सुरू होती. युरोपांतील राष्ट्रांत मोठमोठीं आंदोलनें व क्रांत्या झाल्या, तरी रशियन लोकांत स्वातंत्र्यसूर्याचे बारीकसे किरणसुद्धां पडले नव्हते. सुमारें २५० वर्षांपूर्वी इंग्लिश जनता जागरूक झाली होती. पार्लमेंटनें एका राजाला हद्दपार केलें, दुसऱ्या राजाला फांसावर चढविलें, लोकसत्तेचा विजय झाला. फ्रान्समध्यें मोठी राजक्रांति झाली, राजघराणें नष्ट झालें, अमेरिका स्वतंत्र झाली, तेथील गुलामगिरी नष्ट झाली, इटली–माझिनी—गॅरिबाल्डीचा इटली स्वतंत्र झाला, जर्मनी, बेल्जम, स्वित्झर्लंड वगैरे लहानसहान राष्ट्रें सुद्धां अनियंत्रित राजसत्ता झुगारून देऊं लागलीं. तरीसुद्धां रशिया पारतंत्र्याच्या घनांधकारांत चांचपडत झारशाहीचे जुलुम सोशीत होता. Let all know," proclaimed the last of the Tsars, Nicholas II, "that I intend to defend the principle of autocracy as unswervingly as did my father." राजसत्ता अनियंत्रितपणें चालविण्याचें ध्येय निकोलसनें पार पाडलें; पण तो सरते शेवटीं पडला! इतकेंच नव्हे, तर झारसह राजघराणें, सरदार व श्रीमंत जमीनदारांचा वर्ग ज्या ज्या लोकांनीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें राज्यकारभार चालण्याला मदत केली होती, ते सर्व तसेंच "इंद्राय तक्षकाय स्वाहा" या न्यायानें महायुद्धाच्या वेळच्या राज्यक्रांतींत, दयामाया न धरतां, कापून काढण्यांत आले व अनियंत्रित राजसत्तेला मूठमाती मिळाली.

## सुधारणेचा हप्ता

रशियाचें जपानशीं १९०४ मध्यें युद्ध झालें, तेव्हां राष्ट्रीय पक्षानें डोकें वर काढिलें. तिकडील

२ "Finally, Alexander II, liberator of the Serfs, came to a decision to establish representative national committees with power to give preliminary consideration to legislative proposals; but he was assassinated twenty four hours before the time when the decree was to have been promulgamated." —European Governments by Prof. F.A. Ogg, P.-148




अनुक्रमणिका

पक्षभेद आपल्या पक्षांच्या कल्पनेप्रमाणें नाहींत. त्यांना वाक्स्वातंत्र्य नाहीं. विचार लिहिण्याचें व प्रसिद्ध करण्याचें स्वातंत्र्य नाहीं. कामकरी पक्षांनीं निरनिराळे पंथभेद निर्माण केले होते, त्यांचीं आपापसांत भांडणें व तंटे सुरू असत. सोशल डेमॉक्रॅटिक पक्ष १८९८ त जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पक्षाप्रमाणें स्थापन झाला होता. "सोशल रेव्होल्यूशनरी" क्रांतिकारक पक्ष १९०१ मध्यें निर्माण झाला. तिसरा एक पक्ष होता त्याचें नांव कॉन्स्टिटयूअंट डेमोक्रॅटिक पक्ष असें असून नैर्बंधिकरीत्या काम करण्याचें त्याचें ध्येय होतें. तो १९०५ मध्यें स्थापन झाला. त्यांत मध्यम वर्ग व छोटा व्यापारीवर्ग यांचें प्राबल्य होतें व त्यांचें ध्येय पाश्चिमात्य राष्ट्रांतील प्रजासत्ताक पद्धति व त्यांची उभारणी हें होतें. पहिले दोन्ही पक्ष कार्ल मार्क्सच्या क्रांतिकारक तत्त्वज्ञानाचे अनुयायी होते. हे पक्ष आपलीं कामें व वर्गसंघटना अत्यंत गुप्तपणें करीत असत.[३]

जपानच्या युद्धांत रशियाचा पूर्ण पराजय झाला. पोर्टस्मथच्या तहामुळें रशियाचें एकंदरींत नुकसान झालें; युरोपियन राष्ट्रांत त्याची मानहानि झाली. घरच्या लोकांत त्याची अप्रतिष्ठा झाली. संप, दंगेधोपे व जाळपोळ सुरू झाली होती. मोठ्या शिकस्तीनें नवीन "राज्यघटना" व Imperial Duma ही प्रातिनिधिक संस्था मिळणार या आशेनें जरा लोकांना धीर आला. इसवी सन १९०५ मध्यें प्रातिनिधिक सभेची घोषणा झाली; पण ती लवकर निर्माण होईना. "अशुभस्य कालहरणम्" या न्यायानें रशियांतील सत्ताधाऱ्यांनीं लोकांच्या तोंडाला पानें पुसण्याचा बेत केला ! युद्ध सुरू होतें; पैसा व सैनिक यांची जरूरी होती; अशा वेळीं वाटेल त्या थापा मारणें हें इष्ट ठरतें, ही राजनीति आहे. All is fair in love and war !" असें आपण म्हणतोंच कीं नाहीं? दगडाखालचा हात काढण्याकरितां वाटेल तें करावें लागतें. तशाच धोरणानें झारनें लोकांना हक्क दिले होते. ड्यूमामध्यें सर्व प्रकारच्या लोकांचे प्रतिनिधि होते व मताधिकारही बराच खालीं आणला होता. जर ही घटना प्रत्यक्ष कृतींत आणली गेली असती, तर एकंदरींत जनतेचा व झारचा बराच फायदा झाला असता. पण हे विचार आतां काय उपयोगी? या घटनेंत मंत्रिमंडळ व त्याचा मुख्य प्रधान अशी रचना होती. हें मंडळ मात्र राजाला उत्तरदायी होतें; लोकप्रतिनिधींना नव्हतें. त्याच्या संमतीशिवाय कोणत्याही प्रकारचे निर्बंध संमत व्हावयाचे नाहींत. लोकांना जीवित व मालमत्ता यांची सुरक्षितता व व्यक्तिस्वातंत्र्य, मतस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्यादि सर्व अधिकार दिलेले होते.[४] शेतकरी व कामकरी वर्गाला मतदानाचा अधिकार देण्यांत आला. "A full grant of civil liberty was added inviolability of person, and freedom of thought, speech, assembly, and organisation. A few weeks afterwards another rescript set up the promised electoral system giving votes to the great mass of population including peasants and urban workers. Thenceforth the Tsar was to share the Government of Russia with duly elected representatives of his people.[५]

## सुधारणांचा निष्कर्ष

राजेलोकांनीं प्रजाजनांना कधीं सुखानें सुधारणा दिल्या आहेत काय? लढाईच्या प्रसंगीं वाटेल त्या

३ "All of these organizations existed contrary to law, were forced to resort to underground methods and to lead a hand-to-mouth existence." —Prof. Ogg. see also-"Russian Political Institutions"—M. Kovalevsky. (ch. II)

४ "Modern Constitution"—W. F. Dodd, II, 181-195pp.

५ "European Governments and Politics"—Prof. Ogg, P. 851.





अनुक्रमणिका

गोष्टी रशियाच्या झारनें कबूल केल्या; पण राजकीय हक्क देण्याची पाळी आली, तेव्हां त्यांत शक्य ते अडथळे उत्पन्न केले. जपानशीं सख्य झाल्याबरोबर मार्च १९०६ मध्यें दुसरी सभा " ड्यूमा "च्या डोक्यावर बसविली.त्यामध्यें झारनें नेमलेले प्रतिनिधि झेमस्टोव्हस्, विद्यालयाचे प्रतिनिधि व सरदारांचे प्रतिनिधि होते. असें असूनही या दोन्हीं सभांच्या अधिकारचर्चेच्या बाहेर राखून ठेविलेले विषय होते. परराष्ट्रीय राजकारण, सैन्य व आरमार यांवरील सत्ता, सरकारी तिजोरीची सत्ता, यांसंबंधांची शुष्क चर्चासुद्धां बंद केली होती. झारची सत्ता किती अनियंत्रित होती, हें यावरून स्पष्ट दिसून येईल.

अशा परिस्थितींत सुद्धां निवडलें गेलेलें ड्यूमामंडळ झारशाहीला विरोध करूं लागलें, यावरून झारची राज्यव्यवस्था किती जाचक झाली होती तें दिसून येतें. सोशल डेमोक्रॅटिक पक्ष व सोशल रेव्होल्यूशनरी पक्ष यांनीं या "ड्यूमा" सभेवर बहिष्कार घातला होता. ती सभा विसर्जन पावली. दुसरी सभा निवडण्यांत आली, ती पहिल्यापेक्षां शिरजोर ठरली. याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. सभा बंद पडली ! लोकांना मताधिकार दिला, ही खरोखरच चूक झाली असें झारला वाटलें, म्हणून सर्व नियम बदलण्यांत आले. मताधिकार कमी करण्यांत आले; कांहींचे गट निराळे केले; मतभेद जाणूनबूजून वाढविण्यांत आले; उद्देश हा कीं, आपल्याला पाहिजे त्याप्रमाणें " ड्यूमासभा " ( Duma ) वळवितां यावी म्हणजे बहुमतानें आपल्या इच्छेप्रमाणें वागतां येईल ! आणि त्याप्रमाणें तिसरे ड्यूमा निवडले गेले ! !

" Then the Government concluded that it had made a mistake in sanctioning an eletoral system, that enabled such things to happen, and before ordering another election arbitrarily changed the scheme, withdrawing representation altogether from some parts of the Empire, shamelessly gerrymandering other parts and introducing a complicated class system calculated to ensure the return of majorities amenable to control ![६] ( Prof. Ogg ) नवी ड्यूमा पांच वर्षें टिकली.शेवटची सभा १९१२त निवडली होती, ती १९१७ पर्यंत कशीबशी जीव धरून होती. क्रांती झाल्यानंतर तीही नष्ट झाली !

या सर्व काळांत लोकांना पार्लमेंटरी पद्धतीच्या राज्यकारभाराचें रहस्य समजलें. पश्चिम युरोपांत प्रचलित असलेली राज्यपद्धति त्यांना थोडयाप्रमाणांत पाहावयाला मिळाली. राजकारणाचें शिक्षण जनतेला मिळालें हा फायदा कांहीं थोडा नव्हे. कोणतीच अनियंत्रित राजसत्ता लोकशाहीच्या काळीं व विशेषतः महायुद्धासारख्या बिकट प्रसंगांतून योग्यपणें पार पडूं शकली नसती. रशियांतील जनता झारशाही जुलमाला व त्रासाला कंटाळली होती; काय वाटेल तें होऊं दे, पण ही दुष्ट राज्यपद्धति नष्ट होऊं दे असें सर्वांना झालें होतें. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं सर्वसाधारण जनसमुदायाच्या भावना अशाच झाल्या होत्या. सरदार, जमीनदार व श्रीमंत वर्ग सर्व फायदा मिळवीत असत, व लोकांवर करांचें ओझें लादीत असत. अशा वेळेला जनतेच्या पुढाऱ्यांनीं समता, बंधुता व स्वातंत्र्य ( Liberty, equality and fraternity) यांची घोषणा व रक्तपात करून जुनी राजसत्ता उलथून पाडिली !

## इतिहासाची पुनरावृत्ति !

राजकीय सत्ता गर्वानें धुंद होऊन प्रजेचा अनन्वित छळ करूं लागली कीं, प्रतिकाराची सुप्त असलेली शक्ति वाढूं लागते. अत्याचारांची मालिका या सुप्त शक्तीला जागृत करून प्रज्वलित करतात आणि

६ S. N. Harper–" New Electoral Law for the Russian Duma". " How the World Votes"--D. F. Frary,chap. XXV,



भडकलेल्या मनोवृत्ति अधिकच भडकून राजसत्ते-विरुद्ध बंडाची नौबद झडूं लागते. लहान-मोठे, व ज्ञानी-अज्ञानी सारे एक होऊन राष्ट्रीय निशाणा खालीं जमून सशस्त्र प्रतिकार सुरू होतो. ही ज्वाला भडकण्याला प्रत्यक्ष कारण फारसें लागत नाहीं व अशा रीतीनें राज्यक्रांति सुरू होते. अशाच तऱ्हेनें इतिहासाची पुनरावृत्ति रशियांत होऊं लागली. जर्मनीनें रशियाची पिछेहाट केली आणि पोलंड व इतर प्रांत काबीज केले; त्यामुळें अर्थातच रशियन लोकांचा आत्मविश्वास नाहींसा झाला. महायुद्धाच्या पहिल्याच वर्षी अशी दाणादाण झाल्यामुळें लढाई बंद करून तह करावा असें म्हणणारा पक्ष राष्ट्रांत निर्माण झाला. बोल्शेव्हिक पक्षानें या युद्धांत मुळींच भाग घेतला नव्हता, त्यांच्या चळवळींना व प्रचारकार्याला जोर आला. "ड्यूमा" सभेनें मतदारसंघ वाढविण्याची चळवळ सुरू केली व सरकारला विरोध करण्याचें धोरण आरंभिलें. "Progressive block" मध्यें सर्व पक्ष सामील झाले. फक्त सोशल डेमोक्रॅटिक पक्ष अलिप्त राहिला. झारला काय करावें तें सुचेना. त्याचे स्नेहीमंडळ शत्रुपक्षाकडून पैसे खात होते. झारिना रासपुतीन नांवाच्या भोंदू गुरूच्या नादीं लागली होती व स्वतः झार झारिनाच्या मुठींत होता. राष्ट्रीय आपत्तीच्या प्रसंगीं धोरणानें वागून पुढारीपणानें तोंड द्यावयाला कोणीच तयार नव्हता. "ड्यूमा" सभेची योजना मान्य करण्याला सरकार तयार नव्हतें; इतकेंच नव्हे, तर युद्ध यशस्वी होण्याकरितां सर्व प्रकारच्या चळवळी हाणून पाडण्याचें धोरण सुरू झालें ! याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला.

झारशाहीविरुद्ध मध्यमवर्गानें (Bourgeois) बंड पुकारलें. ११ मार्च १९१७ मध्यें ड्यूमा सभा विशेष अधिकारांत बंद करण्यांत आली. तरीसुद्धां त्यांनीं आपली बैठक भरविलीच. त्यांना कामकरी पक्षाचें वर्चस्व नको होतें. क्रांतीची लाट शमण्याची ती वेळ होती. आपल्याकडून होईल तेवढें करण्याचा त्यानें निश्चय केला. बुभुक्षित लोक रस्तोरस्तीं हिंडत होते. लढाईचा दुष्परिणाम सगळीकडे जाणवत होता. महर्गता व अन्नाचा अभाव यांनीं हलाखीची स्थिति निर्माण झाली होती. लष्कर बोलावण्यांत आलें व रस्ते मोकळे करण्याचा हुकूम देण्यांत आला; पण निराशेनें व्याप्त झालेले सैनिक लोकसमुदायांत विलीन झाले ! ज्या सैन्याच्या जोरावर झारशाही सुरू होती, ते सैनिकच लोकपक्षाला मिळाले. म्हणजेच राज्यक्रांति अर्धी यशस्वी झाली !

पुढील काम फारच सोपें होतें ! हें अत्यंत भयंकर व अमानुष काम ! "Red Terror" (रक्तपात) या नांवानें हा काल इतिहासांत नमूद आहे. सेंट पिटर व सेंट पॉल या नांवाचे दोन मोठे तुरुंग खुले करण्यांत आले. सर्व तऱ्हेचे कैदी बाहेर पडले. लुटालूट, जाळपोळ, व अत्याचार यांना ऊत आला. मोठमोठे सरदार, प्रधान व श्रीमंत यांना पकडून कैदेंत अगर फासांवर चढविलें. समरभूमीवरील शिपायांची कार्याला संमति मिळाली ! ते युद्ध सोडून परत आले. पिटर्सबर्गमधील शिपाई, कामकरी व शेतकरी यांच्या पक्षाचें तात्पुरतें मंडळ स्थापन झालें. "ड्यूमा" सभेनें राज्यसूत्रें प्रिन्स जॉर्ज ल्वह (Prince George Lvov) च्या हातीं देऊन झारच्या निकोलसला राज्यत्याग करण्यास भाग पाडलें. झारचा भाऊ ग्रँड ड्यूक याची अध्यक्ष म्हणून जातांना झारनें नेमणूक केली होती. बाह्यात्कारीं हा देखावा ठीक होता; पण ग्रँड ड्यूक मायकेल अलेक्झँड्रोव्हिच् (Grand Duke Michael Alexandrovich) हा झारशाहीचा पडता मुकुट संभाळण्याला तयार झाला नाहीं. दुसरा निकोलस व त्याच्या कुटुंबांतील मंडळी यांना कैद करून उरळ प्रांतांतील एका खेडेगांवांत –एक्टरींगबर्ग–(Ekaterinburg) १८ जुलै १९१८ रोजीं फाशीं देण्यांत आलें. अशा रीतीनें ही पडती राजसत्ता फारशा त्रासाशिवाय नष्ट झाली !




अनुक्रमणिका

झारशाहीचा शेवट जरी तडकाफडकी लागला, तथापि राजसत्ता काम्युनिस्टांच्या हातीं येऊं शकली नाहीं. तात्पुरत्या सरकाराला अमेरिका व इतर मित्र-राष्ट्रें यांची मान्यता मिळाली. तरीसुद्धां तिला रशियन लोकांचा विश्वास संपादन करतां आला नाहीं. अकस्मात प्राप्त झालेली सत्ता व मताधिकार यांचा उपयोग कसा करावा याचें योग्य शिक्षण जनतेला नव्हतें. जो अनुभव पूर्वीचा होता, तो अगदीं थोडा—असून नसल्यासारखाच—होता; राजसत्तेच्या विरुद्ध सुरू झालेल्या चळवळींना आतां जोर आला; याचा परिणाम म्हणून हंगामी मंत्रिमंडळांत पांच बोल्शेव्हिकांचा अंतर्भाव करावा लागला. तरीही उपयोग झाला नाहीं !

" The fundamental trouble lay in the fact that whereas the new government was a bourgeois government which proposed to reorganize Russia on a constitutional basis after the fashion of Western Europe, the elements among the people at large which were most articulate, cared little about that sort of thing and looked rather to some of loose economico-political organization which would bring power mainly or entirely into the hands of the working classes."—Prof. Ogg, P.856.

### बोल्शेव्हिकांचें खरें स्वरूप !

लोकजागृति झाल्यामुळें जून १९१७ च्या पहिल्या ऑल–रशियन सोव्हियट कॉंग्रेसमध्यें मंत्रिमंडळाला पाठिंबा मिळाला. मार्क्सचें तत्त्वज्ञान पसरत चाललें होतें. लोकशाही पाहिजे होती; पण भांडवलशाहीवर अधिष्ठित झालेली लोकशाही नको होती. सर्व जमीन राष्ट्राच्या मालकीची, धंदे व कारखाने देशाच्या मालकीचे व खासगी मिळकत जप्त करून बडा श्रीमंत वर्ग व भांडवलवाले, व्यापारी, कारखानदार, सरदारवर्ग नष्ट करावा हें तत्त्व बोल्शेविकांचें होतें. "Bolsheviki" (बोल्शेव्हिकी) याचा अर्थ बहुमतवाले असा आहे व त्यांना विरोध करणारे ते मिन्शीव्हिकी (Mensheviki). सोव्हियट संस्थांमधून मतदानाच्या जोरावर बोल्शेव्हिकांना बरीच सत्ता प्राप्त झाली. लढाईच्या बिकट प्रसंगामुळें हंगामी सरकार लोकमताच्या दृष्टीनें नालायक ठरलें होतें. केरेन्स्कीनें ( Kerensky ) सैन्याचा व राजकारभाराचा अधिकार चालविला होता; पण बोल्शेव्हिकांच्या प्रकट विरोधामुळें सत्ता अस्थिर झाली होती. एक शेवटचा प्रयत्न, कीं सत्ता कामकरी वर्गाच्या हातांत, अशी परिस्थिति होती,

दुसऱ्या निवडणुकीच्या वेळीं बोल्शेव्हिकांची ऑल-रशियन-सोव्हियट कॉंग्रेसमध्यें मोठ्या बहुमतानें निवडणूक झाली.ती सभा पेट्रोग्रॅडला ७ नोव्हेंबरला भरावयाची होती; आणि त्या सभेंत राज्यकारभार एकदम हातीं घेण्याचें ( Coup delat ) ठरविण्यांत आलें. ६ नोव्हेंबरला रशियन सैनिकांनीं Winter Palace राजवाडा व इतर सरकारी इमारती ताब्यांत घेतल्या. याला कोणीं प्रतिरोध केला नाहीं. ७ नोव्हेंबरला " केरेन्स्की "–शिवाय सर्व मंत्री कैद करण्यांत आले, व दुसऱ्या दिवशीं नवी सत्ता अस्तित्वांत आली ! लेनिन हा मुख्य प्रधान झाला, व ट्रॉटस्की परराष्ट्रीय मंत्री बनला. युद्ध बंद झालें ! सर्व रशिया राष्ट्राच्या मालकीची झाली ! कारखाने व उद्योगधंद्यांची मालकी मजुरांच्या मंडळांची झाली ! एका रात्रींत लेखणीच्या फटकाऱ्याबरोबर कित्येक शतकांत न झालेली घडामोड झाली, व साऱ्या जगाला नवीन राज्यकारभाराची प्रयोगशाळा पाहावयास मिळाली. ह्या आठदहा महिन्यांच्या घडामोडींची माहिती जरी अत्यंत मनोवेधक आहे,




अनुक्रमणिका

तरी ती देण्याचें हें स्थळ नव्हे. वाचकांनीं ही माहिती दुसरीकडे पहावी.[७]

### सोव्हियट राज्यपद्धति

धी युनियन ऑफ सोशालिस्ट सोव्हियट रिपब्लिक्स ( U. S. S. R. ) हे प्रदेश लेनिनग्रॅडपासून व्होल्गा नदी जेथें कास्पियन समुद्राला मिळते, तेथपर्यंत आहेत. त्याशिवाय सोव्हियट पद्धतीवर निर्माण झालेलीं व वनविलेलीं स्वतंत्र संस्थानें आहेत—तीं " व्हाइट रशियां"मध्यें विशेष आहेत. त्यांपैकीं युक्रेन, ट्रॅन्सकॉकेशिया, खोर्जेम् ( Khorezem ) बुखारा, व पूर्व सैबेरिया हीं प्रमुख होत. १९२० पर्यंत हे भाग पूर्ण स्वतंत्र होते; परंतु जसजशी कम्युनिस्ट सत्ता प्रस्थापित झाली, तसतशी हे प्रांत स्वतंत्र ठेवणें इष्ट नव्हतें म्हणून १९२२ डिसेंबरच्या तहानें युक्रेन, व्हाइट रशिया व ट्रॅन्स-कॉकेशिया यांच्या संमतीनें एक ऑल युनियन कमिशननें तयार केलेली घटना अस्तित्वांत आली. आतां या प्रदेशांत सात प्रमुख संस्थानें सोव्हियट पद्धतीनें चाललेलीं आहेत. या प्रदेशाचें क्षेत्रफळ ८२,४१,९२१ चौरस मैल असून १९२६ मध्यें तेथील लोकसंख्या १५॥ कोटी होती व डिसेंबर १९३३ मध्यें १७ कोटी झाली आहे !

रशियाच्या राज्यघटनेन्वयें कोणत्याही प्रांताला विभक्त होतां येतें. The constitution of Russia proper, for example, specifically recognizes " the right of individual nationalities to separate, upon decisions of their congresses of Soviets, and upon approval of the supreme organs of the R. S. F. S. R. into autonomous Socialist Soviet Republics and regions." ( The constitution ) अशा तऱ्हेचीं १५ स्वतंत्र संस्थानें व १८ प्रांत वेगळे आहेत. त्यांपैकीं अनुक्रमें ११ व १५ हीं रशियामध्यें सामील आहेत. त्यांचें स्वातंत्र्य नुसतें तोंडापुरतें अगर कागदी नव्हे. घटनेमध्यें याचा मुद्दाम उल्लेख आहे. each union republic exercises its sovereign authority independently. The U. S. S. R. protects the sovereign rights of the Union republics. Moreover, each Union republic retains the right of free withdrawal from the union."

रशियन राज्यपद्धतींत सत्ता केंद्रीभूत झालेली आहे. पाश्चात्य लोकशाही ही मजूर व कामकरी शेतकऱ्याला पायाखालीं तुडविण्याकरितां निर्माण झाली आहे व त्या पद्धतींत भांडवलशाहीचें वर्चस्व आहे हें रशियनांना पूर्णपणें पटल्यामुळें त्यांनीं प्रत्येक गोष्टींत कामकरी वर्गाला प्राधान्य दिलें आहे. भौगोलिक दृष्ट्याच त्यांनीं सत्ता केंद्रीभूत केली आहे असें नाहीं, तर राजकीय व आर्थिक दृष्ट्या ती मुद्दाम तशी बनविली आहे. निर्बंधमंडळें निराळीं व ते निर्बंध कृतींत आणणारीं मंडळें निराळीं असा फरक त्यांनीं कोठेंच केला नाहीं. न्यायसंस्थेनें घटनेचे शब्द तावून सुलाखून पाहून कांटेकोर रीतीनें न्यायदान करावयाचें ही भावनासुध्दां तेथें अस्तित्वांत नाहीं. रशियन राजसत्तेविरुद्ध गुप्त कट आहे असा संशय आला, तरीसुद्धां न्यायान्यायाच्या अगर गुन्हाशाबितीच्या कंटाळवाण्या भानगडींत न पडतां तडकाफडकीं गुन्हेगारांचा निकाल लावण्यांत न्यायसंस्था प्रवीण आहे ! आपल्यावर इतर भांडवलशाहीच्या सत्तेचें

७ (१) Leon Trotsky-"Lenin" (New York, 1925)
(२) "My Life"-Lenin (New York, 1930)
(३) Lenin, Red Dictator "-G. Vernadsky (New Heaven, 1931)
(४) "The Revolution of 1917" (New York, 1932)
(५) " Russia "-Sir Sidney & Bealrice Webb.



आक्रमण होत आहे, ही भावना रशियन कॉम्युनिस्टांना झोंप घेऊं देत नाहीं. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं कंसाला "कृष्ण" दिसे, त्याप्रमाणें त्यांना प्रत्येक राष्ट्राच्या हालचालींत मोठे बेत, गुप्त कट, लढायांच्या मसलती, हीं दिसत आहेत.[८]

1 Checks and balances, inviting procrastination and division of responsibility, are conspicuouly absent.

2 Legislative and executive authority rest to all intents and purposes, in the same hands, and there is no independent judiciary.

3 All Government-power is canalized into one swiftly-moving stream of unimpeded action.

—Prof. Ogg, ( p. 874 )

### कार्यपद्धति

येथें मुख्य पक्ष म्हटला म्हणजे सोव्हियट हा होय. हा पक्ष "सोव्हियट" संस्थांच्या रूपानें आपली संघटना करितो. प्रत्येक खेड्याची व शहराची सोव्हियट संस्था आहे. कामकरी संघाच्या सोव्हियट संस्था आहेत. त्या आपापले प्रतिनिधि निवडून मुख्य सोव्हियट संस्थेंत पाठवितात. पिरॅमिडप्रमाणें सोव्हियट संस्थांचें जाळें असून तें मध्यवर्ति संस्थेंत केंद्रीभूत झालेलें आहे. ही मध्यवर्ति सोव्हियट संस्था वर्षांतून एकदांच भरते. पण सर्व सत्ता या संस्थेच्या हातांत असते. शहरांतील लोकांपेक्षां खेड्यापाड्यांतील व मजूरवर्ग अतिशय मोठ्या प्रमाणांत या संस्थेंत निवडला जातो, व त्यांनाच विशेष हक्क व मताधिकार दिलेला आहे. २५,००० लोकांना १ डेप्युटी निवडण्याचा अधिकार आहे, तर १,२५,००० लोकांना प्रांतिक संस्थेंत डेप्युटी नेमण्याचा अधिकार आहे.[९]

मतदानाचे हक्क सर्व सज्ञान व्यक्तींना देण्यांत आलेले आहेत. स्त्रियांना सुद्धा मताधिकार दिलेला आहे; पण भांडवलशाहीचा पुरस्कार करून मजूर कामावर ठेवणारे मोठे शेतकरी (Kulaki), फायद्याकरितां धंदा करणारे कारखानदार व जे अयोग्य मार्गानें धनसंचय करितात, म्हणजे कुळांकडून खंड घेतात ( unearned income) अशांना, तसेंच ख्रिस्ती धर्मगुरु, व झारशाहीचे पूर्वीचे हस्तक व वेडे यांना मताधिकार नाहीं. रशियाच्या राज्यपद्धतींत "मताची" किंमत काडीचीही नाहीं; परंतु त्या जोरावर इतर हक्क मिळूं शकतात. राष्ट्रीय सुधारणांचा माणसाला मोफत उपयोग, राजकीय हक्क, (civil rights) ट्रेड युनियन संस्थांचें सभासदत्व, भत्ता व पोटगी-पत्रकें (Ration cards) हीं त्याला मिळूं शकतात. सरकार त्यांच्या सुखसोईची व स्वास्थ्याची काळजी घेतें. स्त्रियांना स्वातंत्र्य आहे. लग्नाचे निर्बंध, घटस्फोटाला संमति व पुरुषांसारखेच पगार, आरोग्य-गृहें, प्रसूतिगृहें, बालसंगोपनगृहें व क्लिनिक्स (Clinics) यांमुळें स्त्रिया परावलंबी नाहींत. पुरुष व स्त्री यांत राजकीय दृष्ट्या भेद मानिला जात नाहीं.[१०] सोव्हियट कॉंग्रेस "कौन्सिल ऑफ् युनियन्" ची निवड करितें. यामध्यें सर्व प्रांतांचे व स्वतंत्र संस्था-

८ "Recent Political Thoughts".
—F. W. Coker, p 172-173.

९ "The Congress of Soviets of the Union of Socialists Soviet Republics is composed of representatives of town and township Soviets on the basis of one deputy for each 25,000 electors, and of representatives of Provincial Cangresses of Soviets on the basis of one deputy for each 125,000 electors of the population."—The Constitution, Article 9,
—by A. Rothstein.

१० "The Soviet State" —by B. Maxwell, ( 1934. )



नांचे प्रतिनिधि असतात. त्याशिवाय कौन्सिल ऑफ नॅशनॅलिटीज व कौन्सिल ऑफ युनियन् मिळून मुख्य कार्यकारी मंडळ होतें. (Central Executive Commitee of the Union) ही सभा वरचेवर भरूं शकत नाहीं. तेव्हां खरी सत्ता अध्यक्षाऱ्या व "Presidium"च्या (२१ सभासदांचें मंडळ) हातीं असते. हे २१ सभासद कार्यकारी मंडळांतून निवडलेले असतात. या "प्रेसिडम्"च्या खालीं लोकसभेचें मंडळ असतें, तें म्हणजे Council of People's Commissaries; ब्रिटिश मंत्रिमंडळाप्रमाणें हें आहे. या कौन्सिलच्या खालीं पुष्कळ सभा, कमिटया व मंडळें आहेत. शेतकरी व कामकरी पक्षाचीं, तपासणीखातें (R.K.I.) सुप्रीम कोर्ट, व गुप्त हेरांचें खातें (G.O.P.U.) हीं सर्व घटनेनुसार निर्माण झालेलीं आहेत. फ्रान्सप्रमाणें अगर अमेरिकेप्रमाणें कायमचा अध्यक्ष असा या युनियनला नाहीं; परंतु मध्यवर्ति कार्यकारी मंडळाच्या कार्यांना वरचेवर अध्यक्ष नेमले जातात. लोकसभेचा अध्यक्ष असतो. पूर्वी लेनिन हा त्या सभेचा अध्यक्ष होता. रशियन लोकांचा ह्या राज्यपद्धतीवर पूर्ण विश्वास आहे. "The only form of proletarian dictatorship, declared the Second Congress of the third International is a republic of Soviets."

वैयक्तिक मालकी हक्क सोव्हियट रशियांतून कायमचे नष्ट केलेले आहेत. वर्तमानपत्रें व छापखाने व्यक्तीच्या मालकीचे नाहींत. भांडवलाच्या जोरावर मतें मिळविण्याचे दिवस आतां संपुष्टांत आले आहेत. प्रत्येकानें आपलें मत केव्हांही व्यक्त करावें. व्यक्तिस्वातंत्र्य, मतस्वातंत्र्य व संघस्वातंत्र्य पूर्णपणें देण्यांत आलेलें आहे. तथापि स्थापित राज्यघटनेच्या विरुद्ध प्रचार अगर सभा भरण्याला पूर्णपणें बंदी आहे. शाळा–कॉलेजांत कम्युनिस्ट मतांविरुद्ध प्रचार करण्याला परवानगी नाहीं. शिक्षक अगर प्राध्यापक तसें करितांना आढळल्यास तत्काळ त्याची हकालपट्टी होते! अटकाव, बंदी, तुरुंगवास हीं शस्त्रें केव्हांही आढळून येतांत. "The writ of "Habeas Corpus" is unknown, and no person, whatever his position, is immune from danger of nocturnal arrest and secret commitment at the hands of the political police."—(B.W. Maxwell—the Soviet State, ch. XII)

## धर्म

रशियामधून धर्माचें उच्चाटन केव्हांच झालेलें आहे. भांडवलशाहीला अद्यापपर्यंत धार्मिक संस्थांनीं मदत केली असल्यामुळें अशी सर्व सत्ता नष्ट करण्यांत आली आहे. चर्च व देवळें सरकारी मालकीचीं बनलीं आहेत. कामकरी व शेतकरी पक्षांच्या सभा अगर मुलांच्या शाळा, रुग्णालयें तेथें स्थापन झालीं आहेत. देवाचें अस्तित्व काढून टाकण्यांत आलें आहे. धर्म ही अफू आहे या विचारांच्या नास्तिक पंथाची दीक्षा सर्वांना देण्यांत येते. असा मतप्रचार जरी जोरानें सुरू आहे, तथापि जुना ग्रीक पंथ व इतर क्षुद्र चर्चवादी पंथ आपापल्या प्रार्थना मास्कोमध्यें सुद्धां करूं शकतात.

## रशियनांची भवितव्यता

कोणत्याही नव्या राज्यव्यवस्थेला चिरस्थायी स्वरूप येण्याकरितां प्रथम प्रथम फारच काळजी घ्यावी लागते. भांडवलशाही राज्यव्यवस्था पुन्हा डोकें वर काढणार नाहीं; सरदार व श्रीमंत वर्ग सत्ता व पैसा यांच्या जोरावर नव्या राज्यव्यवस्थेला नष्ट करूं पाहील, याबद्दल योग्य ती खबरदारी घेणें अत्यंत आवश्यक आहे. त्याकरितां अत्यंत कडक निर्बंध अस्तित्वांत आले आहेत.

कम्युनिस्ट तत्त्वांविरुद्ध असणाऱ्या चळवळी व चळवळ करणारे लोक या ना त्या कारणानें नष्ट करण्यांत आल्या आहेत. पुष्कळ लोकांवर राज्यघटनेविरुद्ध चळवळ केल्याचा आरोप करून त्यांची रवानगी




अनुक्रमणिका

सैबेरियाच्या ओसाड व दलदलीच्या प्रदेशांत केली जात आहे अगर गुप्त रीतीनें त्यांचें अस्तित्व नष्ट करण्यांत येत आहे. " Cheka " (चेकाची) गुप्त-पद्धति लहानथोरांना पूर्णपणें दहशत बसविणारी आहे. ही गुप्तपणें चौकशी करून शासन करण्याची पद्धति झारशाहीच्या काळीं अस्तित्वांत होतीच ! आतां फक्त नांवाचा बदल करून तीच पद्धति सर-सहा सुरू आहे. सोव्हियट राज्यघटनेविरुद्ध थोडीशी शंका येणारी चळवळ होणार अशा समजुतीनेंसुद्धां हजारों माणसांचे प्राण घेण्यांत आले आहेत.

ही "चेका"ची पद्धति १९२२ मध्यें जरा बद-लण्यांत आली व ती "स्टेट पोलिटिकल् ॲडमिनि-स्ट्रेशन" ( G. P. U. ) राजकीय खातें या नांवा-खालीं चालविली जात आहे. सर्व प्रांतांची मिळून एक राजकीय संस्था आहे. ती " O. G. P. U" ( युनिफाइड पोलिटिकल् ॲडमिनिस्ट्रेशन् ) या नांवानें ओळखिली जाते. परकीय राष्ट्रांचे हेर रशियांत येऊन लोकांना प्रस्थापित राज्यघटनेविरुद्ध बंड कर-ण्याला उत्तेजन देतात, या समजुतीनें ही संस्था डोळ्यांत तेल घालून जपत असते. या संस्था नष्ट करण्याचा बेत रशियन सरकारनें केला होता, पण तो बेत मनांतच जिरला ! ॲलेन मंकहाउसनें मात्र या संस्थेंतील लोकांची व त्यांच्या गुप्त, खुनी चळवळींची वारेमाप स्तुति केली आहे; पण कोणाही व्यक्तिस्वातं-त्र्याच्या पुरस्कर्त्याला ही "O. G. P. U." ची चळवळ नष्ट झालीच पाहिजे असें वाटेल.[११]

लेनिनच्या मृत्यूनंतर ( १९२४ ) स्टॅलिन, काम-नेव्ह, व झिनोव्ही या तिघांच्या हातांत रशियांतील राज्यसत्तेचीं सूत्रें गेलीं. स्टॅलिन हा शेतकरीपक्षाच्या बतीचा होता. कुलकांची ( Kulaks ) म्हणजे शेत-करी वर्गाची व लहान शेतकरी जमीनदाराची सोय करावी व त्यांना सुलभपणें शेती करितां यावी याकरितां प्रयत्न करीत होता. त्याला ट्रॉटस्की व त्याच्या अनु-यायांनीं विरोध केला. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. बहुमताच्या जोरावर त्यांची हकालपट्टीच नव्हे, तर ट्रॉटस्कीला देशत्याग करावा लागला ! पुढें स्टॅलिनपक्षानें शेतकऱ्यांचीं हाडें, त्यांच्या जमिनी व मालकी हक्क नष्ट करून चांगलीच खिळखिळीं करून टाकिलीं. "Collectivization of land" म्हणजे जमिनीचे गट करून राष्ट्राच्या उपयोगाचीं पिकें आधुनिक पद्धतीवर काढावयाचीं व अशा तऱ्हेनें नवे उद्योगधंदे, व कारखाने मोठ्या प्रमाणावर सुरू करावयाचे व पंचवार्षिक योजना सिद्धीस न्याव-याच्या, अशा त्यांच्या कल्पना सुरू झाल्या आणि त्या योजना बव्हंशीं यशस्वी झाल्या हें सर्वांना माहित आहेच.[१२]

## रशियाची अंतर्बाह्य सुधारणा

नव्या योजना जसजशा व्यवस्थित होतील, तस-तशी रशियाची अंतर्बाह्य सुधारणा व आर्थिक उन्नति झाल्याशिवाय राहणार नाहीं. आजकाल रशिया इतर युरोपांतील राष्ट्रांच्या भानगडींत मुळींच पडूं इच्छित नाहीं. रशियाचे अंतर्गत शत्रु नामशेष झाले आहेत. दुसरी क्रांति होऊन बोल्शेव्हिक राज्य-पद्धति आपोआपच नष्ट होईल असें एक दिवस आपणाला वाचण्यास मिळेल असें इच्छिणाऱ्या लोकांची पूर्ण निराशा झाली आहे. निराळ्या राष्ट्रांशीं त्यानें व्यापारी तह केले आहेत. अमेरिकेनें त्याच्याशीं व्यापारांत तह करून आपल्या मालाला मोठी बाजारपेठ मिळविली. इंग्लंडबरोबर मागेंच तह झाला आहे. राष्ट्रसंघाचा ती सभासद आहे. बाकी

११ "It may be true that the G.P.U. is not nearly so terrible as it encourages people to believe; it is certainly true that its members, like the members of the Red Army, perform many social functions of greater obvious fruitfulness than that of a police force."
—Allan Monkhouse.

१२ "The World Since 1914—" W. C. Langstam.



राष्ट्रसंघ हा रिकामटेकड्या कुटाळांचा संघ झाला आहे. त्याचा पूर्ण बोजवारा, जपाननें केलेल्या मँचुकोच्या कारस्थानांत व अबिसीनियाच्या पूर्ण नाशांत उडाला आहे. राष्ट्रसंघ ही संस्था आतां कागदोपत्रीं अस्तित्वांत राहाणार असा रंग दिसत आहे.

रशियन पद्धतीला जर्मनी व इटली यांमध्यें प्रबल शत्रु निर्माण झाले आहेत. इटलींतील फॅसिस्टांनीं व जर्मनीतील नाझी पक्षानें सोशॅलिस्टांची टुरटुर कायमची नष्ट केली आहे. सर्व जगभर समाजसत्तावादी पंथांचीं स्वतंत्र संस्थानें निर्माण करून यांचें फेडरेशन बनविण्याची महत्त्वाकांक्षा आज नष्ट झालेली आहे. रशियापुरती ही पद्धति टिकली तरी पुरे आहे असें बोल्शेव्हिकांना आज वाटत आहे.

इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका लोकशाहीच्या तत्त्वांना घट्टपणें चिलगून आहे. स्पेनच्या युद्धभूमीवर आजकाल लोकशाहीविरुद्ध समाजसत्तावाद हा वाद चांगलाच रंगला आहे. त्याचे परिणाम काय होतात, इकडे सर्वांचे डोळे लागून राहिले आहेत.

रशियन राजपद्धति कितीही वाईट व एकमार्गी, व्यक्तिस्वातंत्र्यावर घाला घालणारी व "O.G.P.U." च्या हातानें लोकांना क्रूर शासन करणारी असली, तरी रशियन कामकरी, शेतकरी, मजूर व गरीब वर्गाला अत्यंत उपयुक्त व साहाय्यकारी झालेली आहे यांत तिळप्राय शंका नाहीं. असें नसतें, तर रशियन लोकांनीं केव्हांच उठावणी करून कम्युनिस्ट पंथांचा व संस्थांचा नायनाट केला असता. याविषयीं अद्यापि पूर्णपणें मत देणें अशक्य आहे. हा एक राजकारणांतील प्रयोग ( Experiment ) आहे. त्याच्या यशापयशावरच समाजसत्तावादी पंथांचें भवितव्य आहे. हल्लींच्या भांडवलशाहीवर उभारलेल्या लोकशाहीचा लोकांना कंटाळा येऊं लागला आहे. त्यामुळें रशियांतील या "प्रयोगा"कडे लोकांचें लक्ष वेधावें हें स्वाभाविकच आहे. वीस वर्षांचा काल हा राष्ट्राच्या आयुष्यांत अगदींच अत्यल्प होय; त्या दृष्टीनें पाहातां रशियन राज्यघटना व त्यांची पद्धति अत्यंत अभ्यासनीय व बुद्धिग्राही झाली आहे. आधुनिक राजकीय घटनांत रशियन राज्यपद्धति, राजकारणाच्या विद्यार्थ्याला एक नवें दालन दाखवीत आहे व त्याला लोकशाहींतील दोष उघड दर्शवून समाजसत्तावादी मार्गांचा विचार करण्याला भाग पाडीत आहे, यांत शंका नाहीं.

—बा. रा. मावळंकर




अनुक्रमणिका

# ऐतिहासिक गोष्टी आणि सृष्टिपावित्र्यपरीक्षा.

बाबा गुरु नानक प्रवासांत असतांना रात्र झाली व एका किल्ल्यावर त्यानें मुक्काम केला. तेथें तो समाधिस्थ असतांना जवळच खेळणाऱ्या कांहीं टवाळ पोरांनीं त्याला हालविला. परंतु तो निश्चल पाहून त्याच्या डोळ्यांच्या पापण्या व नाकपुड्या चेष्टेनें त्यांनीं शिवून टाकल्या व हात घट्ट बांधून ठेवले. नानकाची समाधि उतरल्यावर तो शुद्धीवर आला व आपली ही स्थिति त्याच्या लक्षांत आली. तेव्हां तो तसाच जवळच्या घराजवळ जाऊन उंबरठ्यावर उभा राहून म्हणाला, "कोण आहे का घरांत ? माझ्या पापण्यांचे टांके व हात जरा सोडवाल काय ?" घरांतून एक सुंदर बाई बाहेर आली. त्याची ती विलक्षण स्थिति पाहून तिनें त्याला आतिथ्यपूर्वक घरांत नेलें, व आपल्या दांतांनीं त्याच्या पापण्यांचे टांके सोडून टाकले. असें करतांना तिच्या कपाळाचें कुंकू नानकबाबाच्या कपाळाला लागलें ! इतकें करून नानक त्या घरांतून बाहेर पडत असतांना शेजाऱ्यांनीं त्याला पाहिलें व त्याच्या कपाळावर तांबडें चिन्ह पाहून याचा व त्या बाईचा कांहीं तरी अनैतिक संबंध घडला अशी कल्पना करून घेऊन त्यांनीं मोठाच गोंगाट केला व त्याबद्दल त्यांनीं व तिच्या नवऱ्यानें नानकाला शिव्याशाप दिले. पुढें ती बाई नानकाजवळ येऊन म्हणाली, "बुवाजी, जनसेवा ही ईश्वरसेवा या बुद्धीनें मीं आपली कामगिरी केली. परंतु त्याबद्दल सर्व लोक माझी निर्भर्त्सना करीत आहेत." नानकानें शांतपणें उत्तर दिलें, "उद्यां सकाळीं किल्ल्याचा दरवाजा तुझा हस्तस्पर्श झाल्याखेरीज उघडणार नाहीं." दुसऱ्या दिवशीं सकाळीं लोक उठून किल्ल्याचा दरवाजा उघडूं लागले. पण तो उघडेच ना ! त्यांनीं जंग जंग पछाडले. परंतु व्यर्थ ! तेव्हां याच्या मूळाशीं कांहीं तरी दैविक कारण असलें पाहिजे हें जाणून तिकडे साधुत्वाबद्दल ज्यांची प्रख्याति होती अशा सत्पुरुषांना नेऊन जप सुरू केला, तरीही कांहीं वळेना ! शेवटीं नानकाजवळ येऊन ते म्हणाले, "अरे दरवेषा, काय केलें म्हणजे हे दरवाजे उघडतील हें तूं तरी आम्हांस सांगशील काय ?" नानकानें उत्तर दिलें, "परपुरुषामुळें कधींही जिच्या पावित्र्याच्या भंग झालेला नाहीं, अशा बाईचा हात लागल्याशिवाय हा दरवाजा उघडणार नाहीं." त्याबरोबर पतिव्रता म्हणून प्रसिद्ध असलेल्या एकूण एक स्त्रीनें तिकडे येऊन दरवाजा उघडण्याचा प्रयत्न केला; पण दरवाजा बंदच. सर्व उपाय करून लोक निराश झाले. सायंप्रार्थनेची वेळ झाली. इतक्यांत जिच्या दुष्कृत्याबद्दल एवढा गाजावाजा झाला होता, ती बाई त्याजागीं येतांना दिसली. तिला पाहून तिकडे एक मोठा हंशाच पिकला. तिचे नातलग लोक तिची निर्भर्त्सना करून तिकडून तिला हिसकावून लावलें; पण तिनें त्यांची पर्वा केली नाहीं व दरवाजाजवळ येऊन तिनें केवळ त्यावर थाप मारली. त्याबरोबर दरवाजा एकदम खोलला गेला. लोकांना मोठा विस्मय होऊन ते शरमिंदे झाले व तिच्या पायावर त्यांनीं लोळण घेतली.

–The Dabistan, 1840, vol. II, pg. 249

---






अनुक्रमणिका

# पत्रव्यवहार.

## व्याकरणांतील शंकेचें निरसन

'राजामुनिं सादरं सविनयं वा अवादीत्' ह्या वाक्यांत 'सादरं आणि सविनयं' या समासांना 'बहुव्रीहि' कां म्हणावें आणि 'अव्ययीभाव' कां म्हणूं नये, अशी शंका आहे. ही शंका, ह्याच प्रकारें, प्रस्तुत लेखकाला पूर्वी आली होती. तिच्या निरसनार्थ जो विचार केला, तोच पुढें देत आहें. वरील शब्दांना अव्ययीभाव समास मानावेंसें वाटतें हें साहजिक आहे. पण, त्यांत अडचणीही आहेत. ज्याप्रमाणें प्रत्येक भाषेंत, वाक्यरचना बोलणाऱ्याच्या किंवा लिहिणाऱ्याच्या विवक्षेवर अवलंबून असते, त्याचप्रमाणें व्याकरणांतील व्यवस्थेचेंही आहे. वरील शंकेचें निरसन विवक्षेनें केल्यास, एकपक्षीं, या वाक्यापुरतें असेंही मान्य करतां येईल कीं, हे शब्द अव्ययीभाव समास आहेत. पण. दुसऱ्या पक्षीं, द्राविडी प्राणायाम इष्टापत्ति म्हणून स्वीकारून, त्यांना 'बहुव्रीहि-विशेषण-क्रियाविशेषण ( अव्यय )' असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. त्याचीं कारणें अशीं—१ सादर आणि सविनय हे समास- 'तेन सहेति तुल्ययोगे' ( अष्टाध्यायी, २–२–२८, ) ह्या सूत्रानुसार होतात. वरील वाक्यांत ह्यांच्या ठिकाणचें अन्यपदप्रधानत्व नष्टप्राय झाल्यासारखें दिसतें. पण, तें व्यक्त करतां येईल. 'सादरः सविनयो वा राजा मुनिमवादीत्' असें म्हटलें कीं झालें.

२ 'पक्षी मधुरं कूजति' या वाक्यांत सुद्धां मधुरं हें विशेषण असून, त्याचा क्रियाविशेषणअव्ययासारखा उपयोग आहे, असें म्हणणें भाग आहे. त्यांत द्राविडी प्राणायाम दिसतो. पण गत्यंतर नाहीं. विशेषणाचा असा उपयोग 'सामान्ये नपुंसकम्' ह्या, 'स नपुंसकम्' ( अष्टाध्यायी, २–४–१७ ) ह्या सूत्रावरील कात्यायनाच्या वार्तिकानुसार होय. ह्याप्रमाणें, कोणतेंही विशेषण, मग तें 'समस्त' अथवा 'असमस्त' असो, क्रियाविशेषण म्हणून योजितां येतें.

३ येथें एक गोष्ट सांगितली पाहिजे. व्याकरण सांगण्याची पद्धत कालांतरानें पालटते. त्यामुळें ही शंका उत्पन्न झाली आहे. फार प्राचीन काळीं, नामें, क्रियापदें (आख्यातें), उपसर्ग आणि अव्ययें (निपात) हे चारच प्रकारचे शब्द मानीत. विशेषणें नामांतर्गत समजलीं जात अथवा, प्रातिपदिकें, धातु आणि अव्ययें असे तीनच प्रकार मानीत. पूर्वी, व्याकरण सांगणें म्हणजे शब्द कसा झाला हें दाखविण्यास सूत्रांचा उल्लेख करणें हा प्रघात होता. पण इंग्रजी व्याकरणाच्या धर्तीवर मराठी व्याकरणाची व्यवस्था केल्यामुळें, शब्दांचे आठ प्रकार मानण्याची पद्धत प्रचारांत आली. आणि, मग साहजिकच संस्कृत व्याकरणांत ती परिभाषा आजकाल येऊं लागली आहे.

४ क्रियाविशेषण अव्यय न म्हणतां, 'मधुरं' हें क्रियाविशेषण आहे, असें म्हणणें बरें. अव्यय म्हटल्यास, सर्व विशेषणें, त्यांचा क्रियापदांशीं संबंध येतांच, अव्ययें ठरतील. पण, अव्ययांचा विचार करितांना किंवा त्यांचें परिगणन करतांना, भागवान् पाणिनीनें विशेषणांचा अंतर्भाव त्यांत केला नाहीं. तीच गोष्ट 'सादरं आणि सविनयं' ह्या समासांची होय.

५ क्रियाविशेषण म्हणण्याचें ठरविलें म्हणजे सादरं आणि सविनयम् ह्यांसारखे शब्द बहुव्रीहि राहूनही विशेषणें ह्या संज्ञेला पात्र होतील. कारण, विशेषणत्व यांचा धर्म आहे. त्याचें कारण अन्यपदार्थत्व हें होय. नामाचें काय आणि क्रियेचें काय, विशेषण हें सारखेंच. अर्थात् हें जुन्या पद्धतीप्रमाणें होय.





अनुक्रमणिका

६ जसें, मधुरेण स्वरेण, मधुरस्य स्वरस्य असें आपण म्हणतों, तसेंच, सविनयेन राज्ञा, सविनयस्य राज्ञः, आणि लिंगभेदानें, सविनयया राज्ञ्या, असें म्हणतां येतें. तात्पर्य, ' सविनय ' शब्दाचें बहुव्रीहित्व आणि विशेषणत्व अभंग आहे.

७ ' तेनसहेति ' ह्या वर दिलेल्या सूत्रानें झालेले सर्व समास एका वर्गांत आणिले पाहिजेत. उदा० रघुवंशांत आलेल्या सभार्य, सपत्नीक, सपरिग्रह, सदार, सवत्स, सद्वीप ससत्त्व इत्यादि समासांच्या वर्गांतच 'सादर' आणि ' सविनय ' हे घालावे लागतील. बाहेर ठेवितां येत नाहींत. म्हणून सर्वच बहुव्रीही आहेत. वरील शब्द रघुवंशांत इतस्ततः निरनिराळ्या लिंग-वचन-विभक्तींत आढळतात. उदा., 'सभार्याय गोत्रे' ( रघु. १-५५ ),

८ पण, एक शंका अशी येईल कीं, सादरं आणि सविनयं ( रघुवंशांत हे समास आले नाहींत ) ह्यांत उत्तर पदें भाववाचक आहेत. ' सभार्य ' इत्यादींत सामान्यनामें आहेत. सवत्सौ ( रघु. ९।६ ) ह्यांत विशेषनाम आहे. म्हणून, त्यांचा आणि 'सादरं'चा उपयोग सारखा करितां येत नाहीं. म्हणून, दुसरें उदाहरण घेऊं: ' सविस्मयो दाशरथेस्तनूजः अगारं प्रविष्टां ( वनितां ) प्रोवाच ' ( रघु. १६-६ ), ह्या वाक्यांतील ' सविस्मयः ' हें शुद्ध बहुव्रीहि पद काढून दशरथेस्तनूजोऽगारं प्रविष्टां ( वनितां ) सविस्मयं प्रोवाच ' असें म्हणतां येईल. असें म्हटलें, तरी त्या शब्दाचें बहुव्रीहित्व, विशेषणत्व, अन्यपदप्रधानत्व हे गुण तसेच राहतात. आणि त्यावर अव्ययत्व हा धर्म येऊं शकत नाहीं. कारण,

**'सदृशं त्रिषु लिङ्गेषु सर्वासु च विभक्तिषु**
**वचनेषु च सर्वेषु यन्न व्येति तदव्ययम् ॥**

**अव्ययीभाव पक्षाचें एकच कारण.**

मूळ उदाहरणांतील सादरं आणि सविनयं ह्या समासांना विवक्षेनें अव्ययीभाव म्हणतां येईल असें म्हटलें आहे. पण, असें करावयास देखील भगवान् पाणिनीच्या व्यवस्थेशीं विरोध न आला पाहिजे. ' अव्ययं विभक्तिसमृद्धि ' इत्यादि ( अष्टाध्यायी, २-१-६ ) लांबलचक सूत्रांत अव्ययाचा इतर शब्दांशीं निरनिराळ्या सोळा अर्थीं अव्ययीभाव समास होतो असें सांगितलें आहे. भट्टोजि दीक्षितांनीं ' सह ' शब्द पूर्वपद असलेलीं दोन उदाहरणें दिलीं आहेत. एक यौगपद्य ( Simultaneity ) या अर्थी 'सचक्रम्' आणि दुसरें साकल्य (Entirely ) या अर्थी 'सतृणम्.' पण, सादरं आणि सविनयं ह्यांत हा अर्थ नाहीं.ह्यांत साहचर्य सहभाव आहे. असा अर्थ तर स्वतंत्र ह्या सूत्रांत नाहीं.पण,ह्या सूत्रांतील 'विभक्ति' हा अर्थ घेतां येईल.म्हणजे,उदाहरण वाक्य ' राजा मुनिं विनयेन आदरेण वा अवादीत् ' असें मांडल्यास जुळण्यासारखें आहे. तेव्हां, सादरं म्हणजे आदरेण, सविनयम् म्हणजे विनयेन असें घेतल्यास, हे समास ' विभक्ति ' ( येथें तृतीया ) हा अर्थ दाखवितात. हा एकच मार्ग अव्ययीभावास मोकळा आहे.

—य. रं. विप्रदास, एम्. ए.




अनुक्रमणिका

# नैषधसार.

( मागील अंकावरून चालू )

ऐसे हे गुण सर्व अंगिं असणें मोठें वरा भूषण ।
"नाहीं[1] कोमल नाम त्यास नल हें" भैमी म्हणे
"दूषण." ॥ १२ ॥

जावें पुढें वच असें न पडोनि कानीं ।
नेलें पुढें तिथुन भैमिस वाहकांनीं ॥
देवी म्हणे " नृपति हा बघ हव्यनाम ।
याचें असे उदधिमेखल भव्य धाम. ॥ १३ ॥

त्वद्रूप पाहिल व त्यागिल विष्णु मातें ।
लक्ष्मी वसे चुरित अंकिं पदाब्ज हातें ॥
तेणेंच निद्रित निरंतर शेषशायी ।
या राहिला उदधिमाजि, न अन्य ठायीं."॥१४॥

भैमी म्हणे "नृपति चारु असेल हव्य[2] ।
त्याचा प्रदेशहि असेल समृद्ध भव्य ॥
मी दोष काढिन विलम्ब नसे पळाचा ।
याचा न याचक सुरेन्द्र. कसा नळाचा ?"॥१५

लक्ष्मीविलासवसतींतुन अन्य जागीं ।
नेती क्षणांत मग वाहक भैमिलागीं ॥
देवी म्हणे " बघ पुढें नृप शस्त्रधारी ।
शत्रूंस बाहुबल दाखवुनी निवारी ॥ १६ ॥

हा नाम मेळवि जनीं 'द्युतिमन्' नरेश ।
धाडी दुरी नवनवें यश हंसवेश ॥
तें प्रत्यहीं न्हदसमुद्र वलांडितांना ।
पाही दिगन्त. कृति दुर्लभ पंडितांना. ॥ १७ ॥

यानें बहू पसरल्या गुणवागुरा या ।
भैमीमृगीस शकल्या न परी धराया. ॥
युद्धादि कष्टगत पौरुष हें परन्तु ।
दैवाविरुद्ध नसतें अनुराग हेतु ! ॥ १८ ॥

'जावें पुढें' सुचविण्या हलवून पाय. ।
योजी गुणश्रवणिं जांभयिचा उपाय. ।
ज्योतिष्मताह्व नृप शाल्मलनाथ अन्य, ॥
नाकारि भूपतनया जणु तो अधन्य ॥ १९ ॥

देवी नंतर बोलली " मधुर ह्या मेधातिथीला वरीं
त्याचे लोक न जेवती न बघतां चंद्रा दिनाभ्यंतरीं
राणी होशील आस ही धरुन कां सारा न राहो जन ?
तूझें[1] पाहुन आस्य, दर्श असुनी, लाभेल त्यां
भोजन !" ॥२०॥

वैराग्यरूप निजदृष्टि नृपावरी ह्या ।
टाकीत भीमतनया. मग नीट बाह्या ॥
सारून वाहक तिला दुसरीकडेस ।
वाहून नेति, करिती न विलम्ब रेंस. ॥ २१ ॥

देवी म्हणे " बहुपुढें अनुरक्त राजे" ।
भैमीमना अननुराग तथापि डाजे. ॥
त्यांचें विलोकन रुचे न तिच्या मतीतें ।
वाटे परी अनवलोकन रम्य तीतें. ॥ २२ ॥

यांनीं[2] भूपसुता, व वाहक तिचे सारे उभे खालते ।
यावी केंविं बरें तयां कळुनियां साक्षात् तिचीं इंगितें ?॥
राजे आढळती पथीं मणिमयीं घालून जीं भूषणें ।
भैमीचें प्रतिबिम्ब, त्यांत पडुनी, सांगे पुढें चालणें॥२३॥

"हे ! भैमी नृप हा पहा !" मग म्हणे संत्रस्त ती भारती ।
याची गेलि जडून ऐक अवघी काशीवरी कां रति ? ॥
काशी वंशपरंपरागत असे त्याचीच चेतोहर ।
संसारोत्तरणार्थ धर्मतर ही तो चालवीतो हर ॥२४॥

काशीश्वरासह नृपांस समागतांस
भैमी निराश करि या कर मागत्यांस ।
आहे तिचा अनवलोकन मंत्र गूढ ?
झाले नृपाल सगळे अभिलाषमूढ ॥ २५ ॥

---

१. पांडित्य, कलाकौशल्यादि गुणांनीं **सवन** राजा भूषित असतांना नलानुरागानें त्याचें नांव आवडलें नाहीं व नलाचेंच नांव आमंत्रणयोग्य मधुराक्षर असें वाटलें.

२. भैमी म्हणते–" एवढा हा **हव्य** जर समृद्ध आहे तर इन्द्र याचा याचक कां झाला नाहीं ? नलाचा कां झाला ? दोघांमध्यें महदन्तर आहे.

१. दर्श असूनही चंद्रभक्तांना तुझ्या मुखचन्द्राचें दिवसा दर्शन झाल्यावर त्यांचें व्रत लुप्त होणार नाहीं. त्यांना भोजन मिळेल.

२. पालखींत. ( वाहकांच्या खांद्यावर असलेल्या. )





अनुक्रमणिका

## सर्ग १२

( " येथें पहा त्वदर्थ दुसरे पराक्रमी राजे समुद्रतीरावरून लांबून आले, आहेत. त्यांतून, हे पद्माक्षि ! कुठला तरी एक वर पसंत कर " असें देवीचें वाक्य ऐकून भैमी विस्मयानें पञ्चनलांकडे वळते. )

दुजे दुजे भूप सभासमाजीं ।
आले दिगन्ताहुनि येथ आजी ॥
समुद्रतीरस्थ बहू विलासी ।
जे जाहले मण्डन कुण्डिनासीं ॥ १ ॥

भैमी बरीच थकली शिबिकागता ही ।
हें जाणिलें मनिं विचक्षण वाहकांहीं ॥
ते थांबले, वदलि भूपसुतेस देवी ।
" वर्णूं तरी नृपति हा ऋतुपर्ण कैंवी ? ॥ २ ॥

झाला त्वन्मय, त्या न मुक्तिनगरी आतां अयोध्या रुचे।
याच्या कीर्तिदधींत मग्न असती साऱ्या कवींचीं वचें॥
व्यापी जो वडवानल प्रखर जो त्या सागराचें तल ।
पाडी तें प्रतिबिंब काय अपुलें याचा प्रतापानल ॥३॥

हा सर्व ऐके स्तुतिचा प्रकार ।
भैमी करीना परि अंगिकार ॥
दे काम्य ती अल्प शिरास वक्र ।
करीतसे विस्मय भूपचक्र ॥ ४ ॥

लाजे जिला पिक असून वसन्तहृष्ट ।
वागीश्वरी वदत ती नृप सन्निकृष्ट ॥
हा पाण्ड्यभूमुकुटरत्न युवा नवाच ।
ऐसा मिळे अथ मिळे नच, वानवाच ॥ ५ ॥

ज्याची कीर्ति सुनर्तकी फिरुनियां आली दिगन्ताहुनी।
वंशारोह करोनियां वरिवरी नाचे उडया घेउनी ॥
आतां सज्ज दिसे प्रवीणचरणा जायास लोकान्तरा ।
त्या या वंदित सर्व लोकचरणा कैसें त्यजावें वरा॥६॥

दासी बोलतसे जिला कळतसे तें भैमिचें इंगित ।
"पाहें स्वामिनि! एक कौतुक पुढें वाड्यावरी रंगित॥
नाचे उंच निशाण एक पवनें रंगांगणीं कीं नट ।
स्थापाया वर पाय कांक झटतो मोठा दिसे तो" खट ॥ ७ ॥

भैमी असे अननुरक्त तथापि भूप ।
चित्तीं धरी अभिनिवेश उगीच खूप ॥
दासी तयास उपमान म्हणे शहाणी ।
हा काळ जो बसुं बघे चलशा निशाणीं ॥ ८ ॥

अन्योक्तिनें उठवि हास्य सभेंत दासी ।
तज्जन्य रंग करि शुभ्र सभासदांसी ॥
लज्जा विवर्ण मुख त्यां दिसलें नृपाचें ।
सान्निध्य[1] लक्षित करी असिता सिताचें ॥ ९ ॥

देवी[2] तों वदली कलिंग नृप गे! मोठा असे शूर हा !
तच्छत्रू पळतां; 'वनांत' म्हणती स्वस्त्रप्रियांतें 'रहा' ॥
देशीं अद्भुत काय त्यांस पुसती भिल्ली तयां पाहुनी ।
देती उत्तर "चंद्र शीतल" परी तो उष्ण आहे वनीं ॥ १० ॥

भैमी तदा रचि मुखीं निज अंगुलीला ।
कोणी म्हणे गमति अद्भुत भूपलीला ॥
ऐकावयास हित वर्णन इष्ट कानें. ।
ऐसा निषेध करि ती मुखमुद्रणानें ॥ ११ ॥

देवी नंतर बोलली बघ पुढें कांचीपुराचा पति ।
त्याची पाहिं यशःसरो (वर) मय कशी आश्चर्यवत् निर्मिति ॥
तद्बिन्दूकडुनीच इन्दु मिळती सारीच शोभा जर ।
इन्दूचें[3] प्रतिबिंब त्या सरिं कसें होईल दृग्गोचर!॥१२॥

१. दासीची अन्योक्ति ऐकून सभासद हंसूं लागले. हास्याचा रंग पांढरा असल्यामुळें सर्व सभेचें श्वेतीकरण झालें. पण प्रस्तुत नृपाचें आधींच असलेलें श्याम मुख लज्जेनें अधिकच श्यामवर्ण झालें व त्याच्या मुखाचा काळेपणा सभेच्या श्वेतवर्णामुळें स्पष्टपणें उपलक्षित झाला.

२. कलिंग राजाच्या पराक्रमाला भिऊन त्याचे शत्रु दूर पळत असतां आपआपल्या प्रिय स्त्रियांना वनांत सुरक्षिततेकरितां राहावयास सांगतात. त्या सर्व स्त्रियांना भिल्लिणी विचारतात'तुमच्या देशांत अद्भुत काय आहे ?' राजस्त्रिया उत्तर देतात,'देशीं चंद्र शीतल आहे. तेथें विरह नसतो. येथें विरह आहे म्हणून येथें चंद्र तापद होतो.'

३. या नृपाच्या कीर्तिरूप अंगाच्या एका बिन्दूपासून इन्दूला श्री प्राप्त होते. म्हणजे तडागाच्या अपेक्षेनें इंन्दु हा अगदीं अल्प आहे.






अनुक्रमणिका

तत्कीर्तिश्रवणें न शेष डुलतो चित्तीं धरी भीतिला।
शीर्षस्थापित भू पडेल मिळतां आघात किंचित् तिला!॥
आनन्दाश्रुनिं नेत्र हीन भरुंदे हा होय चक्षुःश्रव।
शेष[1] प्रीति म्हणून दाविल कशी? ऐकून भूपस्तव॥१३॥
ऐकोनि ऐशा नृपकीर्ति गोष्टी।
भीमात्मजेच्या उपहास ओष्ठीं।
सांगे नृपाचें यश वर्ण्य आहे[2]।
नसे नलाचें विचरून पाहे? ॥१४॥
देवी म्हणे बघितलेंस मुळीं नृपा न।
ते कष्टती करिसि तूं नयनें न पान॥
नेपालभूपति जया बहुमान लोकीं।
आतां कृपा करुनि येथ तया विलोकीं॥१५॥
कुठेंही पावो ती स्फुरण रुचिरा दीप कलिका।
तियेमाजी देई शलभ निज देहा हुति न का॥
प्रतापाग्नीमाजी प्रकृत नृपतीच्या प्रखर या।
उडी घेतो जातो ब्रघ रवि [3]पतंगाख्य विलया॥१६॥
भात्यांतला शर कसा नृप काढि आणी।
आकर्ण चापगुण सत्वर केंविं ताणी॥
चापांतुनी शर सुटे, गगनप्रदेश।
वेधून लक्ष कधि वा करि भूप्रवेश? ॥१७॥
चापल्य हें शकति पाहुं मुळीं न सारे।
देऊन दृष्टि रणकौतुक पाहणारे॥
बाधा हतारितनुंच्यावरतीं क्षतांची।
सांगे कथा नृपतिच्या शरमोचनाची॥१८॥
भैमीचें मन जाणुनी हंसतची देवीस चेटी वदे।
यातें वर्णुनि भागलीस तिकडे भैमी न तें चित्त दे॥
सोडोनी जग सर्व सर्वगुणही याच्यांतची कोंदले।
ऐसें सांगुनि निर्गुणा म्हण गुणी; सर्वांत हें चांगलें॥१९॥
दासीनें दिधली नृपास नुकती एकास काकोपमा।
चेटी तीहुनि नीच धाष्टर्य करिते! हीतें नसावी क्षमा॥
आहे शिष्टसभा नियामक तिला कां येथ कोणीच न?।
क्रोधें बोलति हें नृपानुग तयां दूजा निवारी जन॥१९॥
देवी वर्णि पुरूरव्यास पुढतीं तों वेळ ये हीच ती।
दासी तोंड मध्येंच घालि अनुगक्रोधें असें बोलती॥
"देवीला वचनाधिकार सगळा! तूं कोण मोठी सती?।
भ्रूक्षेपें परि तो निवारण करी त्यांतें तयांचा पति"॥२०॥
देवी तों मिथिलाधिपस्तव करी "चावोनियां ओष्ठ तीं[1]।
त्यांतें[2] शत्रुशिरें अचेष्ट पडण्यापूर्वी असें बोलती"॥
होतां ओष्ठय पकार नाहिं म्हटलीं कां 'पाहि' हीं अक्षरें।
मातें हा नृप रक्षिता.परि तुवां हें पाप केलें खरें[3]!॥२१॥
( दिसतसे हें पाप तूझें खरें )

---

१. नाग हा चक्षुश्रव ( डोळ्यांनीं-ऐकणारा ) आहे. या राजाची कीर्ति ऐकून आनंदानें डोळ्यांत अश्रु आणून दृष्टि चोंदून घेत नाहीं. चोंदून घेतली असतां आणखी कीर्ति ऐकण्याचें सुख त्याला मिळणार नाहीं, अशी त्याला शंका वाटते. आनंदानें मानही डोलवीत नाहीं; कारण तसें केल्यास डोक्यावर रक्षणार्थ धारण केलेली पृथ्वी खालीं पडेल ही त्याला भीति वाटते.

मग पंचाईत अशी आहे कीं, शेषानें आपला संतोष तरी कसा व्यक्त करावा!"

२. एकंदरींत तूं किती मागितलेंस तरी या नृपतीच्या गुणांचें वर्णन करणें शक्य आहे. पण नलाचें अशक्य असल्यामुळें नलच श्रेष्ठ आहे.

३. येथें पतंग शब्दांत श्लेष आहे. तेवढयावर या श्लोकाची रचना आहे. पतंग म्हणजे १ शलभ, २ सूर्य. अग्नि नजरेला पडतांच शलभ त्यांत देहाची आहुति देतो. त्याचप्रमाणें या राजाच्या प्रतापाग्नींत प्रत्यक्ष सूर्य पतंगाप्रमाणें शलभाप्रमाणें पाचारण करतो. याच्या प्रतापाग्नींत देहाची आहुति देतो. दिव्याच्या तेजापुढें शलभ जितका हीन, तितका याच्या प्रतापाग्नीपुढें प्रत्यक्ष सूर्य हीन.

१. शत्रुशिरें. २. ओष्ठांना. ३. हा श्लोक थोडासा क्लिष्ट आहे. देवी म्हणते, "हा राजा फार शूर आहे. तसा कूर आहे. हा अशेष शत्रूंना ठार करतो. पण तितकाच दयाळु आहे. मला जीवदान दे ( पाहि ) असें म्हणणाऱ्याला तो राखतो. रणामध्यें, शत्रु अचेष्ट पडले, अहित त्यांतच शवमुष्टिन्यायानें ओठांत दांत रोवून पडले आहेत. या स्थितींत त्यावर कवीची अशी उत्प्रेक्षा आहे कीं, हे वीर अचेष्ट पडण्यापूर्वीच आपल्या ओष्ठांना म्हणतात, "हे ओष्ठ! पकाराचें ओष्ठस्थान आहे. तेव्हां पाही (रक्षण कर) असें म्हणण्याचें पहिलें काम तुझें आहे. तें तूं गर्वानिविष्ट होऊन केलें नाहींस म्हणून मला यानें मारलें. माझ्या मनास तुझा हा अपराध झारण आला आहे.



याचे अश्व खुरें रणीं उखळती भू हें न कोणा कळे
पाडी हा असिभग्न वैरिकरिंची गण्डस्थ मुक्ताफळें ॥
नोहेची नृप हा; कृषीवल; असें सर्वांमुखीं जाणिजे।
जो पेरी हलकृष्ट भूमित अशीं वेळीं यशाचीं बिजें[1]॥२२॥

भैमी करी विघ्न नृपस्तुतींत।
होतें तिचें लक्ष मुळीं न तींत॥
सोडोनियां खिन्न तिथें वसंतें।
देवी स्तवी अन्य नरेश्वरांतें॥ २३॥

" यांच्या प्रतापोष्ण पहा भुजाच।
ग्रीष्मर्तुचा शत्रुवधूंस जाच॥
सोसे न त्यांतें पतिशोक भारी।
प्रपेंत[2] त्या पाजिति नेत्र वारी "॥ २४॥

भैमीचें मन जाणुनी तिचि सखी येऊन मध्यंतरीं।
ठेवी पानपुडा लघु स्मितमुखें तत्काल देवीकरीं॥
सांगे कीं बहुवर्णनें तव घसा शोषून पावे पिडा।
सोपा त्यावर हा उपाय कर तूं चावोनि खा हा विडा
॥ २५॥

देवी म्हणे " हा बघ बौद्ध भूप।
याच्या यशाचें अमित स्वरूप॥
संख्या असे ती मित अक्षरांची।
सामान्य माना कृति वर्णनाची॥ २६॥

झाला[3] अल्प न कान्तिकोश विधुचा त्रैलोक्य ही निर्मितां।
केशांवांचुन शेष काय रचितां, याचा नुरे तो अतां॥
कान्तीचाच अभाव होय तम जें तें वाट तें घेउनी।
याचे केश सुनील हे विधि रची हा युक्तिनें मागुनी
॥ २७॥

नाचायातें रणि अरिशिरें लावि हा कापितां जीं
आकाशीं तीं अहह न शके पाहण्या लोक राजी॥
अश्वांनीं जी धुळ उठविली भू कुटोनी खुरांनीं।
लोकां केलें शिरुनि नयनीं अंध तीच्या कणांनीं!
॥ २८॥

ज्याचा वासित वारिपूर करिती उत्फुल्ल नीलोत्पलें।
पंखें ज्यांत तरंग ते उठविती हंसादिकांचीं कुलें॥
ज्याचें व्यापुनि तीर राजि तरुंची ग्रीष्मोष्म पीडा हरी।
बांधी हा नृप तो तडाग पथिकां विश्रान्ति लाभे खरी
॥ २९॥

याच्या[1] शुभ्र यशें समग्र धुवुनी त्रैलोक्य हें टाकिलें
सारे श्याम पदार्थ लौकिक कथांमाजीच ते राहिले॥
शब्दां गोचर हा अभाव असतो शृंगें शशाचीं तसा।
याची मात्र अकीर्ति गोचर नसे आभास हा कायसा!
॥ ३०॥

जाणे सखी त्वरित भीमसुतेंइंगितासी।
बोले सरस्वतिस ती करुनी स्मितासी॥
ही शब्दगोचर नसून अकीर्ति याची।
वर्णीं करा श्रवण तें इतुकेंच याची॥ ३१॥

१. या राजाच्या यशाची वृद्धि होत गेली एवढें सांगण्याकरितां कवि म्हणतोः यशोवृक्षाचीं बीजें शुभ्रच असतात. त्यांच्या ठिकाणीं शत्रूच्या गजांचीं गण्डस्थळें फोडून आंतील शुभ्र मौक्तिकांची पेरणी या राजानें भूमींत केली व ती भूमि कोणी नांगरून ठेवली, तर याच्या चतुरंगबलांतील अश्वांनीं आपल्या खुरांच्या टापांनीं!

२. पतिमारण शोकानें व्याप्त झालेल्या शत्रूंच्या स्त्रिया ढळढळा सारख्या रडत आहेत, एवढेंच दाखविण्याकरतां यांनीं अश्रुजलाची पाणपोयच घातली आहे.

३. जगांतील कान्तिमान वस्तु निर्माण करतांना चंद्राची कान्ति संपली नव्हती; पण आज ती या राजाचे केशांवांचून सर्व काय (शरीर) निर्माण करतांना सरून गेली, व कान्तीचा अभाव म्हणजेच तम या न्यायानें शेष तमच उरलें. त्याचा उपयोग ब्रह्मदेवानें या राजाचे कृष्ण केश निर्माण करण्याकडे लावलें. अशा कल्पनेच्या भराऱ्या हर्षानें अनेक ठिकाणीं केलेल्या आहेत, त्या वाचकांच्या लक्षांत आल्या असतीलच.

१. याच्या शुभ्र यशानें त्रैलोक्यांतील सर्व श्यामपदार्थ धुवून काढून त्रैलोक्याला उजळा दिल्यावर श्याम पदार्थ फक्त लोककथांतूनच उरले, खरें अस्तित्व त्यांचें नाहींसें झालें. सर्व तऱ्हेचे अभाव शब्दांनीं वर्णन करतां येतात. जशीं शशाचीं शृंगें. पण याची अकीर्ति अशा शब्दांतही वर्णन करतां येत नाहीं. कसा चमत्कारिक आहे पहा.




अनुक्रमणिका

वंध्यासुतात्मक सभा सगळी मुक्यांची ।
कूर्मी पयोनिधित ही सुरिं आठव्याची ॥
गाई परार्धवर संख्य अकीर्ति याची ।
जात्यन्ध दृश्य तमसोपम मूर्ति साची[१] ॥ ३२ ॥

ये या वचें हास्य न वा नृपा हें ।
विदर्भजा तों क्षण एक पाहे. ॥
चित्तांत होती अगदीं उदास. ।
निमित्त तेथें नव्हतें मुदास ॥ ३३ ॥

भैमी तों नल सत्य, देवघटितें पाही पुढें नन्तर ।
देई अन्य नलीं न दृष्टि नसतां रूपांत तें अन्तर ॥
आनन्दाब्धिनिमग्न पोंचुन तला होई अवन्ध्यश्रम ।
सौन्दर्यें सगळ्या जनीं उपजवी पाताळ कन्याभ्रम. ॥ ३४ ॥

देई नैषध दृष्टिदान तिज जें तत्प्रीतिचें संचित ।
इष्टाभ्यारतितुल्य, दुर्लभ सुरां, लाभे तिचें वीक्षित ॥
त्यानें विद्ध सुधामयस्मरशरें सानन्द त्या आन्ध्य ये ।
पाहूं तो न शके फिरून अपरां आकूतपांता तयें ॥ ३५ ॥

———

१. ही भैमीसखी उपहासचतुर आहे. ती म्हणते, " वन्ध्येला मुलें नसतात. मुका बोलत नाहीं. कूर्मी पिलें दृष्टीनें वाढवितें. तिला दूध नसतें. स्वर सात आहेत. आठवा स्वर नाहीं. संख्येची गणना परार्धाच्या पुढें नाहीं. जात्यन्धाला तम दृश्य नाहीं. पण याच्या अकीर्तीला इतके सर्व अभाव गात आहेत. तेव्हां ती वर्णन करतां येत नाहीं असें तुझें म्हणणें खोटें आहे. पर्यवसानानें त्याची अकीर्ति आहे असें ती व्याजोक्तीनें सुचवीत आहे.

२. ३४ व्या श्लोकांत दर्शविल्याप्रमाणें पहिल्यानें भैमीनें नळाकडे दृष्टि टाकली. मग ३५ व्या श्लोकांतील पहिल्या चरणांत दर्शविल्याप्रमाणें नळानें भैमीला दृष्टि-दान केलें. मग तिनें परत नळाकडे कटाक्ष टाकिला, तेव्हां दुर्लभ अभ्यागताप्रमाणें त्या कटाक्षाचें नळानें स्वागत केलें. पण त्या कटाक्षरूपी स्मरशरानें तो विद्ध होऊन आनन्दामुळें त्याच्या दृष्टीला आन्ध्य आलें. नंतर तिनें टाकलेल्या कटाक्षांचें त्याला ज्ञान झालें नाहीं.

## सर्ग १३

( " या पाचांतून वीरसेनाच्या पुत्राला वर, नीट परीक्षा करावयाची टाकून उगाच भ्रमण करीत बसूं नकोस, " अशा अर्थाचें देवी भाषण करते; पण तें श्लेषात्मक असल्यामुळें भैमी संदेहभूमीवरच आरूढ होऊन बसते; देवांचे परोपकार नलरूप धारण करून तिला संशयांत टाकल्यामुळें फुकट गेले असें ती त्यांना निक्षून सांगते.

देवी, जितें विदित सर्व जगच्चरित्र ।
वर्णी सुराधिपतितें वचनें विचित्र ॥
तेणें सुरेंन्द्र सहजीं तर उक्त व्हावा ।
त्याचा न छद्म नलवेश परी कळावा ॥ १ ॥

[१]हा वीरसेनोदय तूं पहा कीं ।
पराक्रमें शत्रुबलास जिंकी ॥
न देखसी तूं अतिबाहुनेत्र ।
हें सर्वची अद्भुत होय तंत्र ॥ २ ॥

———

१. **इंद्रपक्षीं**—हा इंद्र पहा. हा वीरसेनोदय आहे. वीरांच्या सेनेनें याला उदय ( जय ) प्राप्त होतो. हा पराक्रमानें शत्रुबलाला म्हणजे त्याचा शत्रु जो बल नामक राक्षस त्याला जिंकतो. बहुनेत्रांचा भाव ( स्थिति ) ती बहुनेत्रं. ती अतिशयेंकरून ज्याच्यांत आहे तो अति-बाहुनेत्र म्हणजे सहस्रनयन असा इंद्र. पुढें आहे त्याचें हें तंत्र काहीं अद्भुत ( विचित्रच ) आहे.

**नलपक्षीं**—हा वीरसेनोदय म्हणजे वीरसेनापासून उदय ( जन्म ) पावलेला आहे. तो वीरसेनाचा पुत्र आहे. तो पराक्रमानें शत्रुबलाला ( शत्रूच्या बलाला सैन्याला ) जिंकी ( जिंकतो ). तुला हा बाहुनेत्र म्हणजे बाहूच्या ठिकाणीं ठेवलेले नेत्र म्हणजे चीनांशुक ( चीन देशांतील रेशमी कापड ) गुप्त ठेवल्याप्रमाणें तुला दिसत नाहीं. किंवा त्याचे अति म्हणजे हस्ताच्या सामान्य परिणामाहून अधिक परिमाणाचे मापाचे बाहु म्हणजे हात व अतिनेत्र म्हणजे नेहमींच्याहून अधिक प्रसृत असे नेत्र ( पूर्वोक्त बाहू व नेत्र=बाहुनेत्र ) तूं पाहत नाहींस हें आश्चर्य आहे ! ! !




अनुक्रमणिका

याचे[1] पाय सराग भैमि ! असती सर्वत्र लेखार्चित।
हो त्यासीं अजि युक्त जेविं हरिशीं झाली शची उर्जित॥
भूभृत् जिष्णु अपव्ययपाय नकळे हा इंद्र किंवा नल।
नेत्र श्रोत्र न भैमिलागिं कथिती. ती होय दोलाचल !
॥ ३ ॥

भैमीस्थिती जाणुन सर्व देवी ।
सांगावया वायु सखाग्नि केंवीं[2] ॥
गुंफी पुन्हा हार जुळून सूक्ति ।
येई तिची ज्यांत दिसून युक्ति ॥ ४ ॥
[3]हा तो प्रतापनिधि उद्गति हा सदाचा ।
मध्यस्थ नाहिं दुसरा हरिचा यमाचा ॥
कोठें मिळे न अशि भास्वररूप शोभा ।
साधीं शुचींतुन सुवर्ण धरून लोभा ॥ ५ ॥

हे[1] तिग्मासित पार्थिवाधिकरणा पासोनियां जी निघे।
जीतें तापस कीं महेश्वर यदा प्रत्यक्ष पाहूनि घे ॥
होई कारण अंगरामजनना ती भूति याची भली।
घेई ऐकुनि नीट कर्ण रुचिरे वार्ता सुखें लाभली॥६॥

---

१. **इन्द्रपक्षीं**—याचे ( इन्द्राचे ) पाय हे भैमि ! सराग (रागसहित=) भक्तीनें लेखार्चित म्हणजे लेखांनीं ( देवांनीं ) अर्चित ( पूजित ) असतात. देव याच्या पायांची प्रेमानें पूजा करतात.

**नलपक्षीं**—याचे ( नलाचे ) पाय जे सराग ( अरुणाप्रमाणें सराग, रक्त वर्ण, लाल ) आहेत ते लेखांनीं ( लेखा म्हणजे चक्रादि सामुद्रिक लक्षणांच्या रेषांनीं अर्चित ( अंकित आहेत ); म्हणून त्याच्याशीं ( नळाशीं ) आज तूं युक्त हो. कशी तर जशी शची हरीशीं ( इन्द्राशीं ) तशी. अशा वर्णनानें हा भूभृत् जिष्णु ( भूभृत् म्हणजे जे पर्वत त्यांचे पंख तोडून त्यांना जिंकणारा व अपव्ययपाय म्हणजे ( अ+पवि+अपाय=नाहीं पवीचा ( वज्राचा ) अपाय म्हणजे नाश ज्याचा असा, इन्द्र आहे; किंवा भूभृत् जिष्णु म्हणजे भूभृत् राजांचा जिष्णु, जिंकणारा व अपव्ययपाय (अपगत आहे व्यपाय म्हणजे पलायन ज्यापासून ) जो पळत नाहीं असा, नल आहे तें; भैमीला नेत्रांनीं बघून किंवा कर्णांनीं ऐकून निर्णय करतां येत नाहीं म्हणून ती दोलाचल झाली.

२. वायुचा सखा अग्नि कसा आहे तें सांगण्याकरितां.

३. हा श्लोक अग्नीला व नलाला लागू आहे. –अग्निपक्षीं–हा प्रतापनिधि ( प्रतापाचा निधि म्हणजे प्रकृष्ट तापाचा ( दाहाचा ) निधि ( सांठा ) सदाचा (सततचा) आहे.हा उद्गति आहे (ज्याची गति,ज्याच्या ज्वाला) ऊर्ध्व वर जाते,हरीचा व यमाचा म्हणजे इंद्राचा व यमाचा मध्यस्थ म्हणजे इन्द्राची जी दिशा प्राची व यमाची जी दिशा दक्षिण त्यांच्यामधली दिशा अग्नेयी दिशा तिला धरून बसणारा याच्याशिवाय दुसरा देव नाहीं. अशी ( याच्यासारखी ) भास्वररूपशोभा भास्कर ( शुक्ल ) रूपाची शोभा कोठेंही दृश्य नाहीं. हा शुचि आहे. यांच्यातून सुवर्ण ( सोनें ) शुचि करून शुद्ध करून लोभानें सांधतां येतें. अग्नेःप्रजातं परि यद् हिरण्यं अशी एक श्रुति आहे.

**नलपक्षीं**—हा प्रतापनिधि (पराक्रमाचा सांठा) आहे. हा उद्गति सदा उदयवान् आहे. हा अग्नीचा व यमाचा मध्यस्थ आहे; दोघांशीं निःपक्षपातानें वागणार आहे. याच्यासारखा भास्वररूप शोभा ( भा म्हणजे दीप्ति, स्वर म्हणजे शब्दकंठ व रूप म्हणजे सौन्दर्य इत्यादि गुणांची शोभा ) याच्याशिवाय अन्यत्र सांपडणार नाहीं. याच्याशीं लग्न लावून धनाचा लाभ करून घे.

१. **अग्निपक्षीं**—या अग्नीच्या हेतींनीं (ज्वालांनीं) ग्रासित म्हणजे त्यांच्या भक्ष्यस्थानीं पडलेले जे पार्थिव पृथ्वीपासून उद्भवलेले ( तृण-काष्ठादि पदार्थ ) त्यांच्या अधिकरणापासून ( स्थानापासून ) जी निघे म्हणजे जिचा जन्म झाला, ती भूति ( भस्म ) तापस–तप करणारा जो महेश्वर त्यानें पाहून घेतली–पाहिली. तेव्हां ती अंगाला फांसून, त्रिभूतीचें उधळण करून ती अंगाला विशिष्ट रंग आणण्याचा अभिलाष त्याला झाला ही वार्ता सुखानें लाभलेली हे रुचिरकर्णी, तूं नीट ऐकून घे.

**नलपक्षीं**–याच्या (नलाच्या) हेतींनीं (शस्त्रास्त्रांनीं) भस्म झालेल्या पार्थिवाशीं (राजाशीं) अधिकरण केल्यापासून उत्पन्न झालेली भूति म्हणजे ऐश्वर्य जेव्हां तपस्वी महेश्वर म्हणजे यति व धनिक यांनीं पाहिलें, तेव्हां याच्याहून आम्हांस ऐश्वर्य प्राप्त होवो असा अभिलाष त्यांना झाला, ही सुखानें लाभलेली वार्ता सुंदरकर्णि भैमि ! तूं ऐकून घे.




अनुक्रमणिका

भाषा समान अशि अग्निनलांस लागे ।
भैमी म्हणे मम न कार्य म्हणून भागे ॥
रूपैक्य सोडविल हात मुळींच पेंच ।
देवी करी यम निरूपण लागलेंच ॥ ७ ॥
[1]याचा धरी प्रबल भीषण **दण्ड** हात ।
**कम्पाकुलास** जगतास न **पंकपात** ॥
**स्ववैं**द्यगर्वहरणोचित कारणानें ।
याच्या नसे **अमर लक्षित रुग्गणानें** ॥ ८ ॥
देवीप्रणीत यमनैषधवर्णनाचे ।
ऐकून शब्द अविशेष विशेषणांचे ॥
झाली विदर्भतनया मनिं संशयालु ।
देवी करी वरुणवर्णन तेथ चालू ॥ ९ ॥
"[1]पाहें तूं चरणानुराग सुभगे ! हा शोण, याचा **गुणें** ।
याची सिद्ध **सरस्वता**हि करण्या सेवा, धरीं ही खुण ॥
प्रेमानें **कमलाशय** प्रचुर ते यातें भजूं लागती ।
यातें तूं **भुवनाधिपा** भज दुजी कांहीं नसे" सद्गति ॥ १० ॥
बाळा असून विबुधांसहि मायिकांस ।
खोट्या नलांस, न फसे वरुणादिकांस ॥
ज्या शोभली नृप सभां परिवेष जेंवीं ।
त्या नैषधा निजमुखें मग वर्णि देवी ॥ ११ ॥
भाषा एक तिची नलासह जुळे इन्द्रास ती चांगली ।
निर्देशून नळास अन्य उतरे वैश्वानराच्या गळीं ॥

---

१. **यमपक्षीं**—याचा(यमाचा) हात दण्ड (स्वायुध) धरतो, म्हणून कम्पाकुलास पापाला भिऊन अगोदरच सकम्प असलेल्या पापभीरु जगताला पंकपात ( पंक म्हणजे रौरव नरकादिकांत जो पात तो न ( प्राप्त होत नाहीं. ) त्याच्यापासून त्रास होत नाहीं. यमाच्या भयानें कोणी पाप करीत नाहीं. स्ववैद्य म्हणजे प्रत्यक्ष स्वर्गीतील वैद्य त्यांचा (अश्विनीकुमारांचा) चिकित्सा करण्याविषयीं जो गर्व आहे, त्याचें जें हरण (नाश) करण्याला कारण असा जो रुग्गण म्हणजे प्राण्यांच्या कर्मानें प्रेरित झालेल्या यांच्या रोगपीडा गण ( समूह ) त्यांनीं अमर ( न मरणारा ) असा कोणी प्राणी लक्षित ( पाहिला ) नाहीं. कर्मज रोगांची चिकित्सा अश्विनीकुमारांना होत नाहीं व रोगजनित पीडाहरण करण्याचेंही अश्विनीकुमारांना सामर्थ्य नाहीं. म्हणून कोणी अमर असा प्राणी लक्षित ( आढळत ) नाहीं.

**नलपक्षीं**—याचा (नळाचा हात प्रबल) (भीषण) दण्ड धरीत असतां ( नळ राज्यशासन करीत असतां अथवा चतुरंग सैन्य बाळगीत असतां ) कम्पाकुल लोकांचा, पंकांत ( दुःखांत ) पात होत नाहीं. त्याच्या भयाचा नाश होतो. स्ववैद्यांचा ( अश्विनीकुमारांचा ) सौन्दर्याबद्दल असलेला जो गर्व त्याचें हरण करण्याला कारण झालेल्या याच्या ( नळाच्या ) रुग्गणानें ( रुचीच्या गणानें ) कान्तीच्या ओघानें लक्षित ( उपलक्षित ) असा दुसरा अमर ( देव ) नाहीं. अश्विनीकुमार देवांत सुंदर खरे, पण त्यांनांही नलानें सौन्दर्यांत जिंकलें आहे.

१. **वरुणपक्षीं**—हे सुभगे ! भैमि ! याचा ( वरुणाचा ) गुण (सेवक—गुण हा नेहमीं अप्रधान असतो तो ज्या व्यक्तींत असतो, त्या व्यक्तीची तो सेवाच करतो; म्हणून गुण, त्या व्यक्तीचा सेवक होय. ) असा सेवक जो हा शोण (प्रसिद्ध नद) तो याच्या (वरुणाच्या) चरणीं लागलेला-चरणानुराग-आहे; वरुणाच्या चरणीं याचा अनुराग (भक्ति) आहे. फार काय सांगूं ? सर्व नद्यांत श्रेष्ठ जी सरस्वती तीसुद्धां याची ( वरुणाची ) सेवा करते. ही त्याच्या ( वरुणाच्या ) मोठेपणाची खूण धर; मनांत आण; मोठमोठे कमलांचे जे आशय ( आधार ) असे जलाशय जे प्रचुर ( असंख्य ) आहेत, तेही या वरुणाच्या भजनीं लागतात. तूं म्हणून या भुवनाधिपा (भुवनाच्या, जलाच्या अधिपास ) जलाधिपतीस भज ( माळ घाल ).

**नलपक्षीं**— पहा हा याचा शोण ( रक्त, लाल ) गुण या नळाच्या चरणीं अनुराग धरून आहे. याचे चरण लाल नाजुक आहेत. याची सेवा करण्यास सकल शास्त्राध्ययनांत निपुण जी सरस्वती ती ( सिद्ध ) सज्ज आहे; चित्तामध्यें वसत आहे, ही त्याची खूण आहे. जे कमलाशय आहेत ( कमला म्हणजे जी लक्ष्मी तिचा ज्यांना आशय म्हणजे अभिलाष आहे असे किंवा लक्ष्मीचे जे आशय आहेत असे धनिक ) असंख्य लोक याला प्रेमानें भजतात. तूंही त्याला भज. तुला दुसरी गति नाहीं.



अनुक्रमणिका

साजे नंतरची नलासह यमा अन्तीं पुन्हा जी नला ।
शोभे ती वदणा वदे भगवती भांबावतां भैमिला
|| १२ ||

इन्द्रादि सूर्यसुतपाशिनलां समान ।
सश्लेष एक वच तें सकलांस मान. ॥
दे ताप भैमिस अनिर्वचनीय तेंवीं ।
सिन्धूस गुप्त वडवाग्नि असह्य जेंवीं ॥ १३ ॥
कोणी रुचे न सुर हीस नलाकृतीचा ।
रूपामुळेंच अनुराग नलीं न तीचा ॥
हें प्रेम जें कुणि करी जगतीं कधीं तें ।
वाटे खराच कृतकर्मविपाक धीतें ॥ १४ ॥
" कोठें मिळेल खग ज्यास पुसेन ठाव ।
केला असे करुन दूत्य जयें उठाव ॥
येता करून नल निश्चय हंस कामीं ।
ऐसें करी स्मरण सस्मर चित्त भैमी ॥ १५ ॥
देवी म्हणे हृदयिं जो नल सेविलासी ।
तो हाच अश्वहृदयज्ञ असे विलासी ॥
रूपें समान परि योजुन भिन्न काय ।
हा व्यूह निर्मुन करी परिहास काय ? ॥ १६ ॥

बुद्धिभ्रामक पंचकांत म्हणती प्राणेश माझा वसे ।
अंगीं चिन्हें[1] मनुष्यदर्शक मग स्वेदादि नाहीं कसें ? ॥
देवांची स्थिति निर्निमेष दिसुनी कां येत नाहीं मला ?।
दोघांनीं नळनिश्चयीं अडथळा हा आणिला कोठला ?
॥ १७ ॥

दिग्पाल हो ! नळज पावुनि वर्णशोभा ।
तुम्हीं गुणी पडतसा बलि काय लोभा ? ॥
मूर्खान्धकूपपतनें जणुं पुस्तकांचें ।
झालें परोपकृति शील निरर्थ साचें,[2] ॥ १८ ॥

## सर्ग १४

( भैमी देवांची स्तुति करते. देव प्रसन्न होतात. खऱ्या नलाच्या कंठीं ती माळ घालते. देव उभयतांना वर देतात. कल्पवृक्ष उभयतांच्या शिरावर पुष्पवृष्टि करतात. )

धरोनि आशा निषधेश्वराची ।
पूजा करी भीमसुता सुरांची ।
आराधना सादर देवतांची ।
कामप्रसू धेनु गृहागताची ॥ १ ॥

भैमीभक्ति बघून गाढ दृढही संतुष्ट झाले सुर ।
ईच्छी जो प्रकटावया अनल त्या लागे किती फुंकर? ॥
सामोदप्रदिमाभिराम विशदप्रत्यग्र जीं, हृद्य जीं ।
देवां षट्पदमंजुगीत सुमनें वाहून भैमी यजी ॥ २ ॥

( अपूर्ण )

१. स्वेदराहित्य, कण्ठस्थ पुष्पमालेची अम्लानता, निर्निमेषत्व ( पापण्यांच्या उघडमिटीचा अभाव ) इत्यादि देवपणा व्यक्त करणारे गुण सांप्रदायिक आहेत.

२. येथें नल, वर्णशोभा व गुणी या शब्दांवर श्लेष आहेत. भैमी म्हणते, " हे दिक्पाल हो ! नलज (नलापासून उत्पन्न झालेली, नलाची) वर्णशोभा (अंगकांति) तुम्हांला प्राप्त झाली असून—नळाची सुन्दर आकृति तुम्ही धारण केली असून,तुम्ही गुणी ( सौन्दर्यादि गुणयुक्त असून ) तुमचें परोपकारशीलत्व लोभाला बळी पडून नष्ट झालें आहे. तेणें करून तुम्ही माझी प्रतारणा चालविली आहे. तुम्हांला काय म्हणावें नलज ( नळ नामक तृणाची, बोरूची जी लेखणी तिनें लिहिलें गेल्यामुळें ज्यांना वर्णशोभा ( लिप्यक्षर शोभा ) प्राप्त झाली आहे, जीं गुणी ( शुद्धत्वादि गुणांनीं युक्त आहेत अशीं पुस्तकें तीं मूर्खान्धकूपपतनें ( मूर्ख म्हणजे अश्रुतशास्त्र, अडाणी, व त्यामुळें अंध असा जो मूर्खान्ध कूप मूर्खरूपी अन्ध म्हणजे गभीर कूप त्यांत पडल्यामुळें; मूर्खहस्तीं पडल्यामुळें सुज्ञ व डोळस वाचकांच्या हातीं न पडल्यामुळें त्यांचें परोपकारित्व जसें निरर्थ होतें, तसें तुमचें परोपकारित्व निरर्थ झालें आहे.

ही भैमीची विनवणी देवांच्या हृदयाला पाझर आणणारी, पुनर्विचारार्थ केलेली हृदयंगम व परिणामकारक झालेली प्रार्थना रघुनाथ पंडितांनीं येथून उचलून नळाविषयीं आपला अनुराग हंसाला प्रेमानें भैमीनें प्रकट केल्यावर तुझा श्लेषमूलक भावार्थ मला समजला असें हंस सांगत असतां त्याच्या तोंडीं घातला आहे. (पहा र. न. स्वयंवर श्लोक १३१) भैमीचा श्लेषमूलक श्लोक व हंसाच्या तोंडचा श्लोक या दोन श्लोकांचें भाषांतर त्या त्या जागीं दिलेलें आहे. पहा नै. स. श्लो.



# नारायण गणेश चंदावरकर

ले. श्री. द्वा. गो. वैद्य

( विस्तृत चरित्र )

मोहक बाह्यांग, सुंदर छपाई, विपुल चित्रें, मजबूत बांधणी, मोठ्या आकाराचीं पृष्ठें ५७५

किंमत मात्र ३ रुपये; ट. ख. निराळा.

श्री. नरसिंह चिंतामण केळकर चरित्रलेखकाला लिहिलेल्या पत्रांत म्हणतात—

"माझा स्वतःचा ग्रह या ग्रंथाबद्दल फार चांगला असून त्यामुळें मराठी चरित्र-वाङ्मय-ग्रंथांत फार चांगली भर पडली आहे असें मला वाटतें. बाह्यांग इतकें मोहक ज्या (चरित्र) ग्रंथाला लाभेल तो सुदैवी असेंच म्हटलें पाहिजे. अंतरंगही तितकेंच चांगलें आहे. धार्मिक दृष्टीनें अंतरंग नेहमीं रंगलेल्या चरित्रनायकाला तुमच्यासारखा साक्षेपी उद्योगी चरित्रकार लाभल्यानें चंदावरकरांचें त्या अंगचें जीवन फार उठावदार झालें आहे. तुम्हीं केलें याहून इतर दुसरा ग्रंथकार याविषयीं अधिक कांहीं करूं शकेल असें मला वाटत नाहीं."

हें चरित्र प्रार्थना समाजाचा इतिहास ह्या ग्रंथाचे लेखक व संसार व धर्मसाधन ह्या ग्रंथाचे निर्मिते श्री. द्वारकानाथ गोविंद वैद्य ह्यांनीं फार परिश्रमपूर्वक लिहिलें आहे. वर्तमानपत्रांचे उत्तम अभिप्राय.

पुस्तकें प्रसिद्ध बुकसेलर्सकडे व खालील पत्त्यावर मिळतात.

सक्रेटरी, प्रार्थनासमाज, गिरगांव, मुंबई.

संपादक, मुद्रक व प्रकाशक—रामचंद्र काशीनाथ तटणीस,
श्रीलक्ष्मी-नारायण प्रेस, ३६४ ठाकुरद्वार, मुंबई २.
नाडकर्णी आणि मंडळीकरितां ३६४ ठाकुरद्वार, मुंबई येथें प्रसिद्ध केलें





अनुक्रमणिका